सं
१
स



# मोरोपतकृत.

## ब्रम्होत्तरखंड.

# आर्या.

---

माधवचंद्रोबा.

यानीं

रा. रा. परशुरामबल्लाळगोडबोले

यांच्यासहाय्यानें

शुद्धकरून

लोककल्याणार्थ

स्वतांच्या

शिलाछापखान्यात छापिल्या.

---

मुंबई

शके १७८७

सन् १८६६

# मोरोपंत कृत ब्रह्मोत्तरखंड आर्या

श्रीरंगानें वंदुनि सन्मत मी सदुपदिष्ट सल्लीला
गातों ज्या बहुमान्या साधु-सुधा-सुरभि-कल्पवल्लीला १
श्रीब्रह्मोत्तरखंडीं श्रीशिवमाहात्म्य वर्णिलें आहे
यश शिवभक्तांचेंही ज्याला न व्यासमुनि तुला पाहे २
पंचाक्षर-मंत्राचें माहात्म्य महेशभक्तिचें भारी
तेसेंच शिवकथेचें जें जड जीवांसही सुखें तारी ३
मथुरेंत यदुकुलोत्तम होता दाशार्ह भूप हा धन्या
वरिता झाला प्रेमें काशीपतिची कलावती कन्या ४
स्वपुरीं आणुनि राज्ञी राजा संगार्थ तीस तो बाहे
पाहे कलावती न प्रेमें तन्मुख तया न वपु वाहे ५
कामातुर दाशार्ह क्षितिपति सुकलावतीस पाहूनी
जरि याशि सूक्तशतें तरि आलिंगी बळेंचि बाहूनीं ६
भेटे निववाया पति जों तों तत्काळ तीस कीं पोळे
स्त्रीचे अवयव झाले लोहाचे तापले जसे गोळे ७
दाशार्ह स्त्रीस म्हणे दयितें पुसतों यथार्थ सांग मला
पल्लव-मृदुल तुझा हा देह मला दहनतुल्य कां गमला ८
राज्ञि स्मित करुनि म्हणे पुसतां तरि सत्य सांगतें परिसा
जो भगवान् दुर्वासा लाजवितो कल्पपादपा परिसा ९
श्रीपंचाक्षर विद्या तेणें उपदेशिली असे मजला
कीं हा जीवां शिवसा प्रणतशिव करावया सदा सजला १०
विद्यासामर्थ्य हें शुचि वपु केसा शिवेल उद्धत या
जो तप्तायःपिंड स्पर्शाया योग्य होय शुद्ध तया ११

---

१ सत्-मत-साधूंस मान्य. २ सत्-उपदिष्ट-साधूंनीं उपदेशिलेल्या. ३ सत्-लीला-उत्तम लीला. ४ ज्या शिवभक्तांच्या यशाला. ५ तुलना. ६ नमः शिवाय या मंत्राचें. ७ बाळावी. ८ सु-उक्त-शत-उत्तम भाषणांच्या शेंकड्यानें. ९ जळे. १० एका ११ इच्छित देणारा तरु (कल्पवृक्ष) त्यास १२ पाषाण ज्यास लोखंड लागलें असतां सुवर्ण होतें त्यास १३ नम्र जनाचें कल्याण. १४ सिद्ध झाला. १५ तप्त-अयःपिंड- तापलेला लोखंडाचा गोळा. * शिवलीलामृत.

ज्या मद्य मांस सेविति गणिका दुष्टा कुबुद्धिच्या वसती
असती रजस्वभावें राजा त्यां बहुत सेविल्या असती १२
नित्यस्नान-शिवार्चन मंत्र-जप-ध्यान दान-शिवशील
नसतां असा कसा तूं मज विद्या शुचितनूस शिवशील १३
भूप म्हणे ती शैवी विद्या दे तूं मिळो मला शुचिता
तुजसीं केलि कराया संतत माझी तनू असो उचिता १४
राज्ञी म्हणे अयोग्या मी स्त्री उपदेश हा करायास
सद्गुरुसि शरण जा तो देइल वरदेश हाक रायास १५
देईल तुला दाता पुरुषार्थांचा षडानना वर्ग
भर्ग प्रभवर मजला गमतो ज्ञाने महातपा गर्ग १६
नमुनि म्हणावें त्या भव जलधीच्या तूंच लाव तीरा या
ऐसें सांगुनि घेउनि जाय गुरुकडे कलावती राया १७
प्रणता दाशार्हाच्या ठेवुनि करपद्म मस्तकीं विधिनें
यमुनातीरीं शैवी विद्या उपदेशिली दयानिधिनें १८
सद्गुरु-हस्त-स्पर्शें पंचाक्षर-मंत्र-धारणें हाक
देत निघाले सहसा नृपदेहांतूनि कोटिशत काक १९
तत्काळ पावले ते झडपोनी दग्धपक्ष मरणानें
रामापुढें निशाचर जेसे होवूनि अक्षम रणानें २०
विस्मित होउनि राजा राज्ञीहि पुसे विचित्र हें काय
गर्ग म्हणे दोषांहीं मनुतेजःपूर्ण सोडिला काय २१
पंचमहापापादिक दोषांच्या ज्या अनेकशत कोटी
झाल्या भस्म श्रीमत्-पंचाक्षर-मंत्र-शक्ति बहु मोटी २२
मलिन हृदय जें होतें शिवमंत्रें परम शुद्ध राया तें

---

१ स्थानें. २ जारिणी. ३ रजोगुणयुक्तस्वभावज्याचा असा. ४ शिवस्वभाव. ५ स्पर्शिसील. ६ शिवसंबंधि. ७ क्रीडा. ८ शिव. ९ मंत्रतेजःपूर्ण. १० देह.

न समर्थ अन्य ऐसें काहीं पतितासि उद्धरायातें २३
जा झालासि कृतार्थ स्वस्त्रीला चालवीं स्वधर्मातें
श्री-शिव-भजनें भूपा पावसिल श्रेष्ठ नित्य शर्मातें २४
गुरुतें प्रदक्षिण करुनि वंदुनि दाशार्ह जाय गेहातें
स्त्रीस म्हणे गुरुच्या जित सुरतरु-पंचक न काय गे हातें २५
तव वपु चंदन-शीत- स्पर्शें मज निववितें सुदति शयन
हें अमृतरसचि झालें प्राप्त मदन्या असा मुदतिशय न २६
पति पतित नारिला त्वां त्वत्संगें सति जसा मला भवनीं
त्या नंदनाऽभिधानीं हैरिस सुखाच्या असा न लाभ वनीं २७
रतला कलावतीसीं तरि तो विषयीं न सज्जना गमला
शमला मोह महामनु- तेजें श्रमला भवांत न भ्रमला २८
पंचाक्षर-प्रभाव श्रीव्यासमुनींद्र सज्जना कळवी
पळवी मोहातें तो श्रोतृमन श्रीशिवाकडे वळवी २९
भक्तमयूरें लिहिलें श्री-शैव-मनु-प्रभाव-वर्णन हो
या परमाऽमृत-पानीं सालस शिव-भक्त-रसिक-कर्ण न हो ३०

---

## अध्याय २

कर्म महेशोद्देशें केलें तें मुक्ति देतसे सर्व
पर्वांत परम दुर्लभ जें माघोऽसित-चतुर्दशी-पर्व १
या परमपुण्य पर्वीं दुर्लभ उपवास वर्णिला आहे
याहुनि रात्रीं जागर दुर्लभ ऐसें महासुधी पाहे २
याहुनि अतीव दुर्लभ म्हणती शिव-लिंग-दर्शन ज्ञानी
यापरिस सुदुर्लभतर शिवपूजन धरिति हें सुधी ध्यानीं ३

---

१ सुखातें. २ मुत्-अतिशय-आनंदाचा अतिशय. ३ इंद्रास. ४ आळशी. ५ महेश-उद्देश-महादेवप्रीत्यर्थ. ६ शिवरात्रिरूपपर्व.

भव कोटि-शत-ससंचित- शुभ-फलनाच्या महा-विपाकवळें
श्रीशिवपूजन घडतें जीवांला कोमलाच्छ-बिल्व-दळें ४
गंगेंत अयुतवर्षें सज्जन मज्जन करूनि जें लाहे
तें एकदांचि बिल्वें शिव पूजी जो तयासि फल आहे ५
याविषयीं दिव्य कथा जीणें संशय नुरेचि असि कांहीं
श्रवण करावी प्रेमें श्री-शिव-चरणाब्ज-भक्ति-रसिकांहीं ६
इक्ष्वाकु-कुलज राजा होता विख्यात मित्रसहनामा
अतुलप्रताप लोकीं ज्याच्या साहों शके न रिपु धामा ७
त्या मित्रसहें वधिला राक्षस मृगयेंत तदनुजें द्वेष
धरिला मनीं शरीरीं शुचिमनुजाचा जसा तसा वेष ८
सूदत्व स्वीकारुनि मित्रसहाच्या गृहांत तो राहे
वाढी मनुष्य मांस श्राद्धीं पात्रीं वसिष्ठ तें पाहे ९
कोपें वसिष्ठ राक्षस हो ऐसें मित्रसहनृपा शापी
यापरि करुनि निशाचर होउनि कृतकृत्य जाय तो पापी १०
आधीं क्रोधें शापी मग राक्षस-कृत्य मुनि मनीं आणी
देवें वर्षें बारा या राक्षस हो असी वदे वाणी ११
व्यर्थ दिला शाप म्हणुनि आपुलिया होय जो यशा पाया
कुलगुरुला मित्रसहहि घे अंजलिमाजि तोय शापाया १२
मदयंती नृप-दयिता पाय धरुनियां असें नृपा योची
नच कुलगुरु शापावा- आम्हीं यादें नदीं कृपा योची १३
राजा सूक्त सतीचें श्रुतिचें जैसें तसेंचि बहुमानी
जल पायांवरि सोडी धर्माची नकरिती कुलज हानी १४
शापोदकें करपले झाले काळेचि तत्क्षणीं पाय
कल्माषपादनामा होय प्रख्यात म्हणुनि तो राय १५
गुरुशापें राक्षसता त्या मित्रसहा नृपाकडे आली

१ सैपाकीपणा. २ मार्थी. ३ गुरुची. + प्रभावा.

झाली ब्राम्हण हत्या शोभे ब्राम्हण-वधू जसी व्यालीं[1] १६
रे अंगसंग-समर्था. वधिला क्षत्रिय असा कसा पापी
तूं हि प्रिया समागम करितां मरसिल असें सती शापी १७
बाळा ब्राम्हण-भार्या शापुनि नृपरास्सा महोगहनीं
गेली पतिसह उत्तम लोकानें जळुनि ती चिता-दहनीं १८
द्वादश वर्षें सरतां राक्षसभाव क्षितीश्वरा सोडी
शापज्ञा मदयंती कर निज-संगोद्यता नृपा जोडी १९
अनपत्य नृप प्रार्थी दे त्यास वसिष्ठ संततितें
पुत्रवती मदयंती झाली स्तविती समस्त संत तितें २०
ती मूर्तिमती ब्राम्हण हत्या पाठीस नृपतिच्या लागे
बहु पुण्य तीर्थयात्रा करितां कल्माषपाद तो भागे २१
मिथिलेला गेला नृप तों गौतमही तयास्थळीं आला
कल्माषपाद राजा विनयें त्या मुनिसि वंदिता झाला २२
गौतम म्हणे नरेंद्रा कुशल असे कीं त्यजूनियां राज्य
कां फिरतोसि असा तूं वद बा कां आधि वाहसि प्राज्य
भूप म्हणे विप्रेंद्रा सर्वत्रहि कुशल सर्वदा आहे
राक्षसपणांत केली द्विजहत्या सोडिना मला बा हे २४
सर्वस्व दक्षिणा ज्यां विधिने केले असे महायज्ञ
जे ऋषि सहाय झालों मेळविता त्यांसि मी सहायज्ञ २५
मंत्र यथाविधि जपलों यम नियम न लंघितां तपें तपलों
हत्यादोष नखपला चित्तें देहेंचि मी बग खपलों २६
होतों उद्विग्नपर द्विजवर्या त्वां मला दिली भेट
सत्पुरुष-चरण-दर्शन होतें बुडतां भवार्णवीं बेट २७
शरणागत-तारक तूं जरि एकमुख द्विजाहु शिव साचा
बा सत्पताप हरितो नम सर्वहि जेविं नाथ दिवसाचा २८

---

१ सर्पीणि. २ मोठ्याअरण्यांत

दिसतोसि स्कृविस्मित कां परम चमत्कार पाहिला काय
तव रोमांचप्रसरें होउनि कीं व्याप्त राहिला काय २९
गौतम म्हणे नृपाळा क्षितिवरि असतां प्रसिद्ध गोकर्ण
रंक दुरितभय फिटतें याच्या स्मरणें समस्त लोकेर्ण ३०
जैसा श्रीशिव साक्षात् कैलासीं मंदराचलीं राहे
तैसाचि महाबल या नामें गोकर्णमंडळीं आहे ३१
शिखि-राशि-नक्षत्रांहीं जें न पळे सर्व भास्करें तम तें
अघ तीर्थक्षेत्रांहीं नच गोकर्णें अशेषही शमतें ३२
श्रीगोकर्णीं जळती ब्रम्हवधाद्यखिल- पाप-पर्वत रे
येथें सकृत्प्रवेशें जन नमुनि महाबळासि सर्व तरे ३३
ब्रम्हेंद्रोपेंद्रादि श्रीगोकर्णीं अशेष स्कृ तपले
जपले शैयास्थानीं सिद्धि घटजादि मुनि सदा जैपले ३४
सर्प सुपर्ण दशवदन घटकर्ण बिभीषण त्रिदश यक्ष
दानव मानव तपले झाले कृतकृत्य सिद्ध बहुलक्ष ३५
तपली काली जीच्या चरण-नखा क्षम न काळ हेरा̇या
तप करुनि सिद्ध झाले कंदर्प सनत्कुमार हे राया ३६
श्रीविष्णु-प्रमुखांहीं प्राणी संदर्शनें बहु तराया
निजनामांकित लिंगें गोकर्णीं स्थापिलीं बहुत राया ३७
पाहुनि शिवरात्र्युत्सव गोकर्णीं फार बा नृपा धालों
झालों कृतार्थ जनकें बहुत विनविलें म्हणोनि मी आलों ३८
येतां मार्गीं कांहीं पाहुनि आश्चर्य पावलों हर्ष
मरुपथिकावरि पडला जाणों बापा बुधा सुधावर्ष ३९

---

## अध्याय ३

कल्माषांघ्रि म्हणे बा तें मज आश्चर्य काय सांगावें

---

१ देह. २ लोक-जन. ३ जपकरितेझाले. ४ पहाया. ५ तृप्तझालों

संतचि उदार सदय स्वस्तरुसि उदार म्हणुनि कां गावें १
गौतम म्हणे सभाग्या आइक आश्चर्य सांगतों तुज तें
गुह्य कथावें सुजनीं सुक्षेत्रीं बीज पेरिलें रुजतें २
गोकर्णाहुनि येतां माध्यान्हीं तापलों पथीं या गा
सुमरीं स्नान करुनि वट- मूळीं मी बैसलों महाभागा ३
तों जवळचि चांडाळी वृद्धा अंधा क्षुधा निराहारा
क्रिमि कुष्ठ-व्रण-पूय- व्याप्तांगी देखिली निराधारा ४
मरणोन्मुखी तळमळत होती उष्णीं रजांत राहून
मीहि व्याकुळ झालों तीचा अत्यंत ताप पाहून ५
तों दिव्य विमान नृपा गगनांतुनि उतरलें जसा अर्क
शिवरूप पुरुष पाहुनि केला शिवदूत हे असा तर्क ६
म्या उठुनि हस्त जोडुनि होउनियां स्तवन वंदन प्रवण
पुसिलें वदा प्रयोजन आगमनाचें किमर्थ हो कवण ७
चवघे शिवदूत असें वदले या गौतमा महाप्राज्ञा
घेउनि विमाने आलों केली श्रीत्रिभुवनेश्वरें आज्ञा ८
आली करुणा-करुणा- पारावारा महावदान्या या
चांडाळीनें आलों सत्कारुनि उत्तमा पदा न्याया ९
मी अति विस्मित वदलों देहीं तिळही जिच्या नसे शुचिता
चांडाळी सुविमाना कैसी मखमंडपा शुनी उचिता १०
जन्मापासुनि अशुचि प्रायः पापानुगामिनी चंडा
शिवलोकीं कसि नेतां चांडाळी पात्र होय जी दंडा ११
जीस शिवज्ञान नसे जप तप उपवास सत्क्रिया कांहीं
भूतदया शिवपूजन वर्णाश्रमादिनियमही नाहीं १२
शिवलोकीं सुविमानीं वाहुनि नेतां कशी कुशीला हो
प्रभ्रष्टचर्या अविभाव्या[2] कीं म्हणतो सुगतितें असी लाहो १३

---

१ दुष्टस्वभावजीचा असी. २ अमूक प्रकारची असी संभावना करण्यास- जी यावयाची नाहीं असी.

पहिलें पुण्य लव नसे असतें तरि कां असी दशा असती
सांगा दिव्यविमानीं वाहुनि नेतां तुम्हीं कसी असती १४
वदले शिवदूत असें जरि कौतुक गौतमा तुला गमतें
तरि परिस सांगतों कीं शांकयशीं चित्त साधुचें रमतें १५
पूर्वभवांत कमित्रा हे होती विप्र संभवा नावें
जीचें सौंदर्य जनें शीत मधुर जेविं अंभ वानावें १६
अनुरूपा विप्रकता कांता तातें निवेदिली लाहे
कांहींकाल धवासह रतिला पावुनि निवे दिलीला हे १७
दारुण रोगें मेला पति कांहींकाल शील हे रक्षी
होता आत्मा ईचा गुरुगेहीं जेविं पंजरीं पक्षी १८
यौवनभर स्मरज्वर होतां येईल कां मना शीलें
रक्षक विवेक नसतां पुण्य-व्रत-काम कांम नाशील १९
मग गुप्त व्यभिचार प्रारंभ करून लक्षणें कळली
मळली स्वजनें विटली स्पष्ट घटस्फोट करुनि कीं त्यजिली
शूद्रविटांसीं रमतां बहु धनवान् शूद्रपति इला पाहे
वाहे जावुनि राहे गृहिणी होऊनि तत्गृहीं वा हे २१
प्रसवे शूद्रापासुनि कृतसादर मद्य मांस हे भक्षी
झाली अति विषयांधा वाहिन कांहीं न आपुलें लक्षी २२
तो शूद्र गृहीं नसतां भक्षावें मांस हें मनीं आणी
गोवत्सातें मानुनि मेष नमीं हे महासिनें हाणी २३
नेउनि गृहांत वधिला गोवत्स असें मदाकुला पाहे
कोण्या एका कळनें भ्याली शिव शिव तदा वदे वा हे २४
एकमुहूर्त मुनींद्रा पश्चात्तप्ता उगीच हे राहे
मग अर्ध खाय कोठें अघभय मदिरारतीं जनीं आहे २५
बाहिर गोवत्साचें अर्ध शरीर त्यजूनि हे पापा

---

१ पतिव्रता नव्हे अशी. २ भ्रातिव्रत्य. ३ महा- असि- मोठ्या खड्गानें
\+ मदनव्यथा.

आक्रोश करी व्याघ्रें वधिला गोवत्स हा पहा बापा २६
आक्रोश श्रवण करुनि आले धांवोनि लोक जवळील
कीं धरले हा कोमल गोवत्स व्याघ्र कां न कवळील २७
दुसरे दिवशीं ग्रामां- तर्गत भर्ता इचा गृहा आला
सांगे व्याघ्रें वधिला गोवत्स असें मृषाचि हे त्याला २८
ऐसें पाप करुनि हे दुर्वृत्ता गौतमा पुढें मेली
नेली यमदूतांहीं मग यमधर्में विचारणा केली २९
चांडाळी केली कीं या ऐशा दुष्कळासि हे अर्हा[१]
अंतक-सभासदांहीं व्हाया अतिदुःख-दुर्दशा गर्हा[२] ३०
जात्यंधा कुष्ट-व्रण- कृमि-दुर्गंधाकुळा कृशा काळी
झाली ईस कदन्नें उच्छिष्टें माय बापही पाळी ३१
माता तातहि मेला बंधुजनें त्यागिली महापापा
वरितो कोण अशा या मूर्ता नरकास गौतमा बापा ३२
वसनाऽशनार्थ हिंडे देशोदेशीं धरूनियां यष्टी
न भरे पोट न झाके वपु होय सदा गदाकुला[३] कष्टी ३३
श्रीगोकर्णीं यात्रा विपुला शिवरात्रिकारणें आली
वसनाऽशनार्थ तेथें हेही पातक-समृद्धिची[४] आली ३४
मार्गोजवळ बसे जरि शक्ति शरीरीं नसे बसायाची
वसनाशनाभिलीना सर्वजना करुनि हे पसा याची ३५
जनहो दया करावी मज दीनावरि तुम्हीं न कोपावें
झांकाया तनुसि वसन अशन करायासि अन्न ओपावें ३६
एसें चतुर्दशीच्या दिवसीं रात्रीहि हे जना मागे
कोणी कांहीं न दिलें वा ग्लानी करुनि याचितां भागे ३७
यांहो यांहो म्हणतां श्रमली बहु अर्धरात्र जों झाली
तों अंजलिमाजि इच्या कोणी जन बिल्वमंजरी घाली ३८

---

१ योग्या. २ निंद्या. ३ गद-आकुला-रोगानें व्याकुळा असी. ४ सखि

भक्षाया योग्य नव्हे म्हणुनि इणें बिल्वमंजरी हातें
दूर रचविली दैवें शिवलिंग-शिरींच पाडिली वातें ३९
रात्रौ जनासि मागत होती श्रीशिवचतुर्दशींत पण
दैवाच्या योगें हे अन्नाचा पावली न एक कण ४०
क्षेत्रांत भद्रकाली प्रख्याता भगवती तिच्यामागें
क्रमुनि निशीतें तेथुनि निघतीझाली सकाळ हे रागें ४१
तेथुनि निघोनि आली या स्थानातें पथीं बहु श्रमली
श्रमली क्षुद्रोगार्त प्रभुकसि निजदयेसि पात्र हे गमली ४२
आज्ञा करूनि आम्हां प्रभुनें प्रेषुनि विमान आणविली
पुससी म्हणुनि तुज मुने चांडाळीची प्रवृत्ति जाणविली ४३
कृपणीं कृपालुता जी प्रभुची तुज कळविली मुनिवरा हे
शिवकीर्तिस कर जोडुनि एकिकडे शारदी पुनिव राहे ४४
कर्म-विपाक-गति पहा कैसी अत्यद्भुता मुने आहे
भगवत्प्रसाद-भाजन होउनि सुपदासि अधमही लाहे ४५
पूर्वभवीं अन्नोदक-दान नघडलें इला कधीं लेश
यास्तव महामुनें हे पीडिति उग्र क्षुधा तृषा क्लेश ४६
व्याली मद्य मदांधा जात्यंधा यास्तव पातकें झाली
चांडाळी यास्तव कीं नाहीं गोवत्स भक्षितां व्याली ४७
जारपथरता म्हणवुनि दुर्वृत्ता दुर्भगा असी रंडा
शोभवि वपु मदवेगें पावलि कुष्टव्रणा महादंडा ४८
हे शूद्रासीं रमली कृमि पूय-क्षतज-पीडिता म्हणुनी
भोगविहीना झाली विषयाहुनि न व्रतें गुणें गणुनी ४९
वसती मर्त्यशरीरीं अघचिन्हें जाणतात जे कवि ते
दैवति सविति अन्या बुध सर्वार्थ-प्रकाशिते सविते ५०
जे बहुरोगी क्षत-धन- वर्जित याचक कुलक्षण क्लिष्ट

---

१ क्षत्-रोग-आर्त-क्षुधारूपरोगानें पीडित.

निर्विद्य भोगविरहित विकलांग कुरूप दुर्गुणाश्लिष्ट ५१
निर्लज्ज निंद्य दुर्भग परसेवक सर्व हे महापापी
जन्मांतर-कृत जें जें तें कर्म शुभाशुभें गुणें व्यापी ५२
नरदेहीं शुभ अशुभहि समजुनि जो जंतु करितसे पाप
तो केवळ आत्मघ्न प्राप्त तया होय सर्वदा ताप ५३
अथवा सकलें पापें करितो जो काय सर्वदा नर तो
स्मरतो शिवासि तरि तो जरिही नरतेल शुभपथीं नरतो ५४
मुनिशार्दूला जेव्हां पूर्वभवीं करुनि हे दुरित मेली
यमदूतांहीं बांधुनि दृढपाशांहीं यमालयीं नेली ५५
तेव्हां वितर्क झाला बहु भास यम-सभासदामाजी
दंड करावा किंवा न करावा पापिणीस या आजी ५६
याजन्मींचेंचि दुरित पूर्वी हृदयीं इच्छा नसे जडलें
होतें प्रथम म्हणावें ब्रम्हकुळीं जन्म तरि कसें घडलें ५७
याजन्मींच अघ इणें बहु केलें पावली जगीं गेही
तरिही ब्राम्हण-कुलजा नोहे नरकीं वसावया अर्ही ५८
नेणुनि गोवत्सातें आधीं मदिरा-मदाकुला मारी
ध्याली जाणुनि वदली शिवशिव हे पूर्वपुण्य अतिभारी ५९
गोवत्स-वधें पावे कंपातें मारुतें जसी कदली
अघ नाशाया शिवशिव ऐसें विस्पष्ट हे मुखें वदली ६०
जरि एकदांहि वदली शिवशिव ऐसें तथापि हें नाम
गुरु मंगल गणवेलचि या उच्चारेंचि हें पर-धाम ६१
एका जन्मीं केलें अघ दारुण तत्फलासि भोगाया
व्हावी चांडाळी हे चरित इचें मत कवींस हो गाया ६२
क्लेशांहीं परिपीडन जें वारंवार होतसे कांहीं
याहुनि अधिक नरक तो सुज्ञमतें अन्य सर्वथा नाहीं ६३

१ निंद्य. २ योग्या. ३ मोठें.

म्हणवी दुर्जन मम हा व्याधि हरिद्रत्व मूर्खता हाय
एकेकहि नरकच मग सांगावें ज्यांत सर्व तें काय ६४
श्रावण-सुकृतें घेती झाली विवशाहि नाम जे नारी
तेणेंचि अन्यजन्मीं अंतीं बहु पुण्य करिल हे भारी ६५
त्याचि महापुण्यानें पावेल तरोनि यातना रुचिता
होइल परमपरानें शंकरभक्तच्या अनुग्रहें उचिता ६६
श्रीशिव-सेवक येतिल शिवलोकीं गौरवूनि नेतील
देतिल परमपद कवि कोटिसुरें स्तुति करोनि घेतील ६७
ऐशा प्राण्याचे तों आम्हीं शास्ते नसों स्वयें युक्त
प्रभु हाच विचार करुनि तोचि करी जीव बद्ध कीं मुक्त ६८
ऐसा करुनि विचार द्विजवर्या चित्रगुप्त-यम यांहीं
हे सोडिली सुमित्रा परिपालित-भगवद्भक्त-समयांहीं ६९
पडली भूचर झाली चांडाळी प्रथम जें वदे शिव तें
सुकृत इच्या पदरीं बा जग यानामेंचि तापलें निवतें ७०
श्रीशिवरात्रीस इला घडला उपवास जागर स्पष्ट
बिल्वें शिवलिंगार्चन मग कां सरतिल न पातकें कष्ट ७१
नामग्रहण उपोषण बिल्वार्चन जरि जसेंतसें घडलें
जडलें भक्तत्व पहा परमपद बळें इच्या गळां पडलें ७२
योग्या परमपदा हे ऐसा बाहोनि शंकरा बेल
मग सद्भक्तगृहीं कां मोक्ष न होउनि विशंक रावेल[1] ७३
ऐसें वदोनि केली ती दिव्याकृति महेशदूतांनीं
बैसविली सुविमानीं भगवच्चरणाब्ज-भक्ति-पूतांनीं ७४
प्रथम स्वप्न गमे मग समजुनियां ती म्हणे अहा देवा
दे वास पदीं साच्या दीनाच्या बंधु तूं महादेवा ७५
त्वन्नाम-वर्ण-एकहि अघनग शत हरिल गा महाबाहो

---

१ वागेल.

थापरिचि आवराया नत-मानस-हरि लगाम हा या हो ७६
बहु विस्मयकर भगवत्- चर्या-माहात्म्य या नसे जोडा
म्हणतें कवींस लिहिले असतिल जे इतर सत्य ते खोडा ७७
प्रभु विल्वपत्रभावें होउनि संतुष्ट परमपद देतो
चेतोहर[1] वरचरित प्रकटुनि विलवासि दुरित भय नेतो ७८
शक्रादि लोकपति जे विस्मित झाले पहावया आले
त्यांदेखत शिवलोकीं नेली रूर[2] या यशोमृतें धाले ७९
गौतम म्हणे नरेंद्रा हें अति आश्चर्य देखिलें येणें
मी वेधलों जसा वा वेधावें मधुर नर-रवें एणें ८०
तूं जा गोकर्णातें तृण शतहि महाबळापुढें हत्या
अत्यादर दीनाच्या अवनीं प्रभुकीर्ति हे नृपा सत्या ८१
ऐसें हित कथुनि पुसुनि गेला मिथिलेसि तो महाविप्र
गोकर्णीं नृपहि तरे शिवरात्रि महाबलाऽर्चनें क्षिप्र ८२
या पुण्य-कथा-श्रवणें गानें तरतात सर्वही प्राणी
श्री ब्रम्होत्तरखंडीं श्रीव्यासाची असी असे वाणी ८३

---

## अध्याय ४

शिव-पूजा-माहात्म्य- श्रवण करावें सदा परम सार
भवसागरांत बुडतां श्रीशिवपूजाचि होय परपार १
पूजा स्वयें करावी श्रद्धेनें दुर्बळें पहावि तरी
अवलोकिलिही ईश्वर-पूजा अत्युत्तमा मोहा[4] वितरी २
अश्रद्धेनेंही जो श्रीशिवपूजा विमुक्तिदा करितो
किंवा विलोकितो जो परमपदातें विनिश्चयें वरितो ३
होता किरातदेशीं राजा नामें विमर्षण ख्यात

---

१ चित्तहरणकरणारें. २ हरिणें. ३ नेजा. उत्सवा. ४ समर्पी.

मिरवी प्रताप लोकीं लीलेनें मथुनियां अरिव्रात ४
शठ सर्व-मांस-भक्षक मृगयारुचि चपल निर्दय क्रूर
तो सर्व-वर्ण-वनिता-रत सोडी धर्ममयपथा दूर ५
परि आळस शिवपूजा करितां तिळमात्रहि न मनांत धरी
दोहीं चतुर्दशींत प्रेमें उत्सव सदा विशेष करी ६
त्या सर्व-भक्षकाचें परभार्या-सेवनादि जें पाप
तें चिंतुनि तन्महिषी- सद्बुद्धि-कुमुद्वती धरी ताप ७
एकांतीं पतिस पुसे राजा वज्रांगदा चित्र मज वाटे
वाटे चित्तीं हर्ष क्षण येणें क्षेण समूळ मग आटे ८
दुष्टाचरण तुझें हें कोठें कोठें महेश्वरीं भक्ती
कीं नित्य सर्वभक्षक तूं तुज परदार-सेवनासक्ती ९
क्रूर सकल-हिंसा-रत- करिसी शिवभक्ति तूं तथापि कसा
तुजपासूनि बुध पावे बहु काकापासूनि व्यथा पिकसा १०
ऐसें स्त्रीनें पुसतां नृप करुनि विचार कौतुकें डोले
सत्कारुनि राज्ञीलें हांसूनि तो मधुर आदरें बोले ११
दयिते पहिल्या जन्मीं मी होतों सारमेय पापानें
हिंडें अन्नार्थ पुरीं होउनि बहु विकळ जठर-तापानें १२
शिवरात्रि-महापर्वीं श्रीशिवपूजा शिवालयीं पाहें
अन्नाकरितां द्वारीं व्याकुळ होऊनि मी उभा राहें १३
दंडधर क्रुद्ध पुरुष माराया धांवले तदा प्राण
रक्षायासि पळालों तेथुनि भय पावुनि प्रिये जाण १४
पुनरपि शिवालयातें आलों करुनि प्रदक्षिण द्वारीं
दंडधरांहीं केलीं पिटुनि पुन्हा विकल इंद्रियें सारीं १५
तदपि प्रदक्षिण करुनि शिवमंदिर मी पुनःपुन्हा द्वारीं
बलि-पिंडाप्रतिलोभें राहें दुर्विध जसा विपद्वारीं १६

१ शत्रुसमूह. २ उत्सव. ३ कोकिलस. ४ कुत्रा. ५ दरिद्री. ६ विपत्-घर-विपत्तिसमूहीं.

कोपुनि धनुर्धरानें माझे मर्मींच हाणिले बाण
गेले तत्काळ शिव- द्वारीं सांडुनि दुर्वपु प्राण १७
शिव-सन्निधि- प्रभावें राजकुलीं जन्मलों पहा जाये
अत्यद्भुत भगवत्-पद- महिमा वर्णावया न हो यो ये १८
जी श्रीचतुर्दशी शिव- पूजा दीपावली प्रिये पाहें
त्या अत्यद्भुत-पुण्यें संप्रति कालत्रयज्ञ मी आहें १९
मी सर्वभक्ष झालों आहें प्राग्जन्म-वासना- योगें
दुर्लंघ्या प्रकृतीतें मोठे ज्ञानेहि मोडिते भोगें २०
यास्तव चतुर्दशींत प्रेमें मी पूजितों शिवाला हें
जाणुनि तूं श्रद्धेनें भद्रे पूजुनि शिव शिवा लाहें २१
राज्ञी म्हणे नरेंद्रा धन्यत्व असें नसेल अन्यास
कीं झालासि कृपात्र ज्ञानास शिव- प्रसाद-जन्यास २२
पूर्वचरित माझेंही मज करुणा करुनि तूं कळिव राजा
त्या सिद्धि तुला शिव-पद- पद्मीच्या गुरुमुखा अलिवराज्या २३
भूप म्हणे तुज कथितों होतिस मागिलभवीं कपोती तें
अत्यद्भुता महेश्वर भक्ति तुझें मन सदा जपो तीतें २४
देवि तुज कपोतीस क्रव्य मिळालें वनीं असें लक्षीं
त्या मांसास्तव लागे तुजमागें गृध्र दूरदृक् पक्षी २५
श्रीगोलीं शिवमंदिर त्यातें करुनि प्रदक्षिणा श्रांता
बसलीस तूं ध्वजाग्रीं पिशित-पिंडमुखी भयाकुल-स्वांता २६
गृध्रें खडनर-तुंडें धांवुनि गांठुनि पळांत ताडून
नेलें मांस तुज तळीं त्या ध्वजशिखरावरून पाडून २७
तूं काय कपोत-ज्ञात क्षम गृध्रासी करावया न रण
पडतांचि शिवद्वारीं देवि तुज प्राप्त जाहलें मरण २८
झालिस राजस्त्री तूं अभिमुखमरणें प्रदक्षिणाक्रमणें

१ दुःखपु दुष्टशरीर. २ भगवत्पदमहिमा. ३ मला. ४ आतां. ५ मांस. ६ मांसपिंडमुखींजीच्याअसी.

भ्रमण नको बहु नर्वे भ्रमकल्या स्मरणें तुझे भव भ्रमणें २९
राज्ञी राजासि म्हणे जरि हरिलें देह कौंकमरि दोघें
पद सर्वज्ञा आम्हीं पावों कोण्या गतीस तरि दोघें ३०
भूप म्हणे यावरि मी होइन सैंधव नृपाल तूं धन्या
होसिल माझी भार्या जो कयशा सृंजयेश तत्कन्या ३१
तिसऱ्या जन्मीं होइन सौराष्ट्रेश्वर कलिंगराज-सुता
होसिल माझी दयिता साध्वी सद्गुणा समस्त-साधु-नुता ३२
होइल चतुर्थ पंचम तव मम शुभ जन्म षष्ठ सप्तमही
जाऊं शिवलोकातें स्वयशें निववुनि वियोग-तप्त मही ३३
ब्रम्हज्ञान अगस्त्या-पासुनि पावेन सप्तमीं नमनें
तुजसह कल्पांतींही होइन शिव-भक्त-तप्त मी न मनें ३४
हे शिव-पूजा-दर्शन- पुण्यें सद्गति पहा कुतुरियाची
भक्तिच [1]स्कतरि तदन्या स्कन्न म्हणाया न [2]हो कु[3]तरि याची ३५
यापरि निज-पति-कथित श्रवण करुनि बहु कुमुद्वती हर्षे
पूजुनि पतिसें श्रीपशु- पतितें प्रेमाश्रु ती सती वर्षे ३६
प्रेमें चतुर्दशींत श्री-शिव-पूजन करूनि तो भूप
सप्तमजन्मीं झाला श्री-शिवलोकीं सदार शिवरूप ३७

## अध्याय ५

शिव-भक्ति-लेश-युत जो धन्यतर त्रिभुवनांत तो सर्व
शंकर-प्रसाद-भाजन उच्चतर न तदन्य उच्चही स्वर्वें[4] १
शिवपूजन-व्रतें बडे सकल दिवसांत तो दिवस महित[5]
संसारीं आस दिवसचि बहु परि करिती न ते शिवसम हितः
नर नारी षंढ असो किंवा चांडाल पुल्कस[6] आणी

१ अनमनेकरा- २ हाय- ३ याईटमीका- ४ हस्व- ५ पूज्य- ६ नाम-
विशेष (चांडाळांतील भेद) + काळ- संचित- ओघ- काळनदीच्याप
याहें

तो शिवभजनें सद्यो- मुक्त असी व्यासमुनि वदे वाणी ३
काय कुलें आचारें शीलादिगुणेंहि होतसे काय
शिव-भक्ति-लव-युताचे वंद्य समस्ता जना सदा पाय ४
जें अर्पिलें शिवाला भक्तीनें पत्र पुष्प फल तोय
श्रीब्रम्होत्तरखंडीं श्रीव्यास म्हणे अनंत तें होय ५
प्रीति कलत्रीं पुत्रीं वित्तीं तैसी शिवार्चनीं करितां
पावे जन सिद्धीतें हें अद्भुत काय हो मनीं धरितां ६
होता उज्जयिनींत क्षितिपालक चंद्रसेन यानावें
ज्यातें सकविजनांहीं दुसरा वासव असेंचि बानावें ७
पुरवर्ति महाकाल- प्रभूची परभक्ति चंद्रसेन धरी
त्यासीं पारिषदोत्तम[1] मणिभद्र बहु प्रसाद सख्य करी ८
चिंतामणि मणिभद्रें दिधला त्या चंद्रसेन-राजाला
कौस्तुभमणिचा महिमा जैसा तैसा असे बरा ज्याला ९
ज्याचा स्पर्श सुवर्णचि उपेला[2] ताम्रा अयां[3] करि वपुस
जो अर्थिजनासि म्हणे कल्पतरूचें मला चरिंच पुस १०
परिसुनि अद्भुत-गुणपर नृप लोभ धरूनि मागती मणितें
तो हांसे परतेजा[4] भगवज्जन-तेज काय हो गणितें ११
याच्या भंगें झाले ते नरनायक समस्तही क्रुद्ध
वेष्टुनि पुरीस म्हणती दे मणि भेटोनि शीघ्र कीं युद्ध १२
मत्सरि- भूपालांहीं स्वपुरी सर्वत्र रोधिली पाहे
जाय महाकालातें शरण स्थिर चंद्रसेन तो राहे १३
नृप निर्विकल्प निर्भय दृढनिश्चय मूल सृष्टिचें अर्ची[5]
कीं कामाद्यरि-तूला त्याच्या प्रोद्दाम दृष्टिचें अर्ची[6] १४
रात्रिंदिन महापूजा आरंभी चंद्रसेन सन्महित
जीतें विलोकितांही भावें व्हावें समस्त-जन्म-हित १५

१ पारिषद-उत्तम-सभासदश्रेष्ठ. २ पाषाणा. ३ लोहा. ४ अन्यतेजा. ५ पूजी. ६ तेज. + कथिलास.

कोणी विधवा गोपी सहज महाकालदर्शना आली
तद्बालक-मति पाहुनि पूजा तत्काल शिवपरा झाली १६
तो पांचां वर्षांचा स्नत मातेनें निजस्थळा नेला
तेणें स्व-शिबिर-निकट श्लक्ष्णप्रस्तर शिव स्वयें केला १७
करि कल्पित शिवपूजा तो बाळक कल्पितोपचारांहीं
दिव्यांऽबर-मणि-कंकण- कुंडल-केयूर-मुकुट-हारांहीं १८
प्रासु कुंकुम तोय इतर गंधाक्षत धूप दीप जे अर्पी
ते कल्पित नैवेद्यहि सत्य प्रेमाऽमृतें शिवा तर्पी १९
पूजी पुनःपुन्हा मग वाचे वंदी किशोर तो भावें
लोभावें मानस तें प्रेम बहु प्रेमळांत शोभावें २०
यापरि मन परमेश्वर- पूजा-परमोत्सवांत तो लावी
तों वारंवार तया तन्माता भोजनार्थ बोलावी २१
श्रवणचि नकरी वास्तव उत्तरहि न भक्त-बाळ तो ओपी
तो पी अमृत तया घे कांजी म्हणणें तसें करी गोपी २२
जाय न ओढुनि नेतां कीं मन पूजा-स्मरणार्णवीं बुडवी
ताडुनि पूजन-सह स्नत-कल्पित शिवलिंग गोपिका उडवी २३
जरि परम प्रेमळ बहु- मत स्नत शिवभक्त अनघ रागेली
आलिंगुनि द्रवावी परि कठिन करूनि मन घरा गेली २४
शिशु बहु रडे शिवार्चन तें जेव्हां माय दे विसकटून
हें नकरुनि जरि देती प्याया म्हणता कदा विष कटू न २५
तो एकमुहूर्त पडे मूर्छित मग दृष्टि उघडुनी पाहे
तों रत्न-प्रासादीं मणिमय शिवलिंग पूजिलें आहे २६
उठला सहसा शिशु तो तें अत्यद्भुत विलोकितां भ्याला
झाला मग्न बहुस्मरीं पूजा-माहात्म्य समजला धाला २७
मग भूवरि दंडसम प्रभुतें वंदी म्हणे अगा धात्या

१ लहान पाषाण.

अपराधा मातेच्या पोटीं घालीं ज्ञाता अगाधा त्या २८
शंभो गोपी चुकली हें स्पष्ट नव्हे तव-प्रभाव-ज्ञा
न जळावी जेविं जळें करुनि पतंगी दव-प्रभावज्ञा २९
त्वद्भक्तिभव सुकृत जरि माझ्या पदरीं असेल तरि देवा
माता प्रसाद पावो अनुदिनिं भावें करीन मी सेवा ३०
ऐसें विनवुनि भावें प्रणतें वंदुनि पुनःपुन्हा बाळ
देवालयांतुनि निघे अस्ताचा प्राप्त होय तों काळ ३१
स्वशिबिर जाउनि पाहे शक्र-पुराऽधिक हिरण्य-रत्नमय
तेविं रचाया शकता अष्टशतेंहि न करूनि यत्न मय ३२
त्या निज भवनीं दांतीं[1] पर्यंकीं माय निद्रिता पाहे
रत्नाऽलंकारवती रूपें अमरी जसी तसी आहे ३३
तो तीस म्हणे माते ऊठ श्रीशंकरें कृपा केली
सुदशा-दिवस उगवला ते कुदशा तामसी निशा गेली ३४
गोपी उठोनि पाहे दिव्य स्वाकार शिबिर सुख लाहे
शंभुपदीं शिर वाहे स्तवुनि म्हणे निजजनांत शिरवा हे ३५
स्ववपु अपूर्व अपूर्व स्वकृत स्वभवन अपूर्व पाहोन
गोपी निमग्न परमा- नंद-समुद्रीं मुहूर्त राहोन ३६
अतिहर्षें कळवी तें सर्व महाश्चर्य वृत्त पुरपतितें[2]
तें श्रवण करुनि ध्यावें नाडुनि तापें कधीं न उर पतिनें ३७
नृप पूजा-नियमांतीं येउनि मानुनि लघुस्वभावानें
त्या गोपिका-सुताच्या पाहे शिव-तोषण-प्रभावातें ३८
मणि कनक-प्रासादीं मणिमय शिवलिंग देखतां हर्षें
त्या भक्तवत्सलातें नमुनि प्रेमाश्रु भूप तो वर्षे ३९
आलिंगी त्या गोपी- तनुजा कवि चंद्रसेन गहिंवरुन
ओवाळुनि बहु सांडी मणिमय रवि-चंद्रसेन गहिंवरुन

---

१ हस्तिदंताचा (पर्यंकशब्दाचें विशेषण) २ चंद्रसेननृपतितें.

सपुरोहित सामात्य प्रेमें भेटुनि तया निघाला हो
नृपति म्हणे बापा तूं भिय गणपतिहूनि बहु शिघाला हो ४१
वेढुनि पुरीस होते जे राजे मत्सरी तिमिर वीर्ती
ते साधु-चंद्रसेन- प्रीति-सुरभि वत्सरीति मिरवीती ४२
दूतमुखें निर्वैर क्षितिप सकल दर्शनेच्छु जाणविले
ते साधुचंद्रसेनें न्हाया जन्मुनि कृतार्थ आणविले ४३
न्यस्तायुध सर्व नृपति शशिसेनातें करूनियां प्रणती
गोपीचें दिव्यालय पाहुनि बहु धन्य धन्य ते म्हणती ४४
त्या रत्न-प्रासादीं पाहुनि मणिलिंग भक्तिनें नमुनी
मानिति गोपीतनया-हुनि अधिक ज्ञानशक्तिनें न मुनी ४५
गोपसुता अनुसरले सर्व नृप नमुनि सभाजन कराया
शिवरत सकळ वर म्हणे अश्रेष्ठ न मुनिसभा जनकराया ४६
धन गोधन हय गज रथ वस्त्रें रत्नें समर्पुनि प्राज्य
गोपकुमारासि दिलें गोपांचें भूपमंडळें राज्य ४७
तेथें हनुमान् प्रगटे वंदुनि पूजिति तयासि ते राजे
गोपसुतानें प्रेमें आलिंगुनि तो वगसनीं साजे ४८
सर्वांसि म्हणे परिसा गति शिवपूजेविना भवीं धन्या
जीवांसि सर्व पातक वारुनि तारावया नसे अन्या ४९
पाहुनि शनिप्रदोषीं शिवपूजन मंत्रहीन या बाळें
केलें त्याचें हें फळ शिव इतरें होय काय गावाळें ५०
हा वल्लव-सुत-नामा श्रीकर याच्या कुळांत जो भावी
तो अष्टम-नंदाख्य त्रिजगीं तत्कीर्ति फार शोभावी ५१
कीं या पुण्यें त्याचा ब्रम्हादि-ध्येय जो सदानंद
श्रीकृष्ण पुत्र होइल बहु सुख पावेल तो सदा नंद ५२
ऐसें सांगुनि झाला श्रीहनुमान् गुप्त मान्य जो शिवसा

---

१ सुजन.

भजकांतें भव्यपदीं म्हणतो ज्याचा प्रसाद जोशि वसा ५३
शिवभक्त भूप झाले भक्तीं प्रभुचा प्रसाद पाहून
गेला कांहींकाल श्री-शिवभक्तां-समीप राहून ५४
हनुमन्-मोक्काचारें तो श्रीकर चंद्रसेनही युक्त
श्री-शिव-भजनींच सदा होउनि दोघेहि जाहले मुक्त ५५
श्री-शंभु-भक्ति-वर्धन अद्भुत आख्यान हें सदा गावें
श्रीराम-कृत मयूरें वंदुनि संतांसि वर्णिलें भावें ५६

---

# अध्याय ६

श्रीशंकर-प्रसाद प्रणतांच्या उरु[1] भवार्णवा[2] स्फकवी
सर्व-प्रदोष-पूजा महातप असा नसे वदे स्फकवी १
भगवान् प्रदोषसमयीं कैलासीं नाचतो रू-रस-दात्या
स्तविति प्रेमें वर्णिति योगींद्र सुरर्षिही स्फर सदा त्या २
शिवपूजन प्रदोषीं करितां ऋण रोग सर्व ताप सरे
व्यापुनि सतां शिवरूपा जसि भा शशिकांत-पर्वता पसरे ३
जड मदभाग्य दुर्मति नीचहि विपदर्णवीं[3] तरे सर्व
करितां प्रदोषसमयीं पूजन होतो प्रसन्न बहु शर्व ४
याविषई इतिहास व्यास-कथित सर्व पाप वाराया
परम समर्थ स्फरत निधि परिसावा आपणासि ताराया ५
राजा विदर्भदेशीं होता प्रख्यात सत्यरथनामा
ज्याचा गुणगण रुचला पुर-राष्ट्र-जना मुलां जसा आमा[4] ६
बहुकाळ प्रकृतींतें रक्षुनि गुरु-सचिव-संमतें धर्में
शर्में देता झाला श्रुतिविहितें करुनि समुचितें कर्में ७
वेढुनि विदर्भनगरी त्यासि रणीं शाल्व जाहला मथिता

---

१ मोठ्यासंसारसमुद्रा. २ वाळवी. कृष्णकरी. ३ विपत्-अर्णव-विपत्ति समुद्रीं. ४ स्तन. ५ प्रजांतें. + कांति

अशिसीं भाडत होता नगरी परि जाहली बहु व्यथिता ८
सत्यरथाची महिषी अंतर्वत्नी[1] भयाकुला पुर तें
सोडुनि रात्रिं निघाली धैर्य नसा संकटीं कसें पुरतें ९
पश्चिमदिशेसि दूर श्रांता साध्वी सरस्तटीं गेली
हाय म्हणत अतितप्ता वृक्षच्छायेंत गर्भिणी ठेली १०
त्या स्थानीं पुत्रातें सुमुहूर्ती प्रसवली अतिश्रांता
प्याया जळ जाय सरीं कीं होती जाहली तृषाक्रांता ११
त्या राज्ञीतें सहसा ओढुनि ने ग्राह[2] एक कासारीं[3]
दुःसह दुःखें आधीं भेटाया राजबाळका सारीं १२
तो जातमात्र गत-पितृ-मातृक पावोनि फार आबाळ[4]
क्षुद्विकळ रडत होता सरसस्तीरीं करूनि आ बाळ १३
तों विप्रस्त्री विधवा वर्षांचा सुत जिचा असा आली
द्रवली उमाभिधा ती तो बाळ अनाथ पाहती झाली १४
हाहा गत-पितृ-मातृक सुंदर अच्छिन्न-नाभिनाळ कसा
शुचिकुलज असें कळतें जरि तरि परिपालितें स्वबाळकसा १५
चिंतेंत भिक्षु शिवसा दिवसाधिपसाच ये महातेजा
शशिमंडळासि शिवती नियती डोळे नसे पहाते ज्या १६
श्रीभिक्षु उमेसि म्हणे ब्राम्हणि संशय नसोचि बाळा या
नें स्वगृहासि स्तन्यें[5] अन्नेंहि स्व-सुत-तुल्य पाळाया १७
हित कथुनि जाय भिक्षु स्वगृहा हर्षोनि ने कुमारा हे
पोषूनि एकचक्रीं भिक्षान्नें बाळयुग उमा राहे १८
प्रार्थुनि सद्विप्रांतें समयीं संस्कार ती उमा करवी
देव उपनयन होतां त्या दोघां भिक्षुवृत्तितें धरवी १९
बाळ-द्वय-सहित[6] उमा विप्रा भिक्षा घरोघरीं मागे
भागे बहु परि भोगा आलें जें तें करावया लागे २०

---

१ गर्भिणी. २ मकर. ३ सरोवरीं. ४ हाळ. ५ दुग्धें. ६ हिशाला.

ग्रामीं भिक्षा मागत बाळ-द्वय-युक्त ती उमा फिरली
देव-नमस्कारार्थी द्विजसंकीर्णीं शिवालयीं शिरली २१
शांडिल्य महर्षि तया सत्यरथसुता तथाविधा पाहे
पाहे व्यथा म्हणे अति गहना प्राक्कर्मगति[1] खरी आहे २२
या ब्राम्हणीस माता मानितसे बंधु हा इच्या तनया
म्हणतो स्ववृत्ति भिक्षा तुमजे अत्यंतदुर्गता[2] जन या २३
तें श्रवण करूनि उमा शांडिल्यातें म्हणे अहो स्वामी
हा बाळ भिक्षुवचनें म्या अविदित-कुळहि पोषिला धामीं[3] २४
कोणें वंशीं झाला हा बाळक कोण तात वद याचा
याची माय कवण वा धीरें होतो कृतार्थ सद याच्या २५
शांडिल्य म्हणे याचा सत्यरथ विदर्भराज तो तात
वधिला समरीं अरिनीं स्मरुनि जया साधु साश्रु होतात २६
याची सरोत माता नेली ओढूनि यम-सम-ग्राहें
याचें दुःख श्रोत्यां दाविल सर्वत्र तम समया हें २७
वंदुनि उमा म्हणे बा कां मेला भोग भोगितां राजा
त्याची जल पीतां कां नक्रें नेली सरोवरीं भाजा[4] २८
या राजसुता आली जन्मा येतांचि कां दशा पापा
तापा या निववाया सदुपायहि सांग वत्सला बापा २९
मुनिवर्य म्हणे होता पूर्वभवीं पांड्यनृप विदर्भपती
करितां प्रदोष-पूजन कोलाहल ऐकिला पुरा अंतीं[5] ३०
त्यजुनि शिवार्चन नगर-क्षोभाची धरुनियां मनीं शंका
गेला उठोनि पांड्य क्षितिपति जोडोनियां महापंका ३१
मंत्री धरूनि घेवुनि दारुण-सामंत-शत्रुला आला
ऐसें समजुनि पांड्य प्रमुदित निज-विजय-वैभवें झाला
शत्रु-शिर-छेदानें करवुनि शिवपूजनीं स्मृती ठेवी

1 प्राक्-कर्म-गति-पूर्वकर्माचीगति. 2 अत्यंतदरिद्री. 3 गृहीं.
4 भार्या. 5 नगरासमीप.

नेमसमाप्ति नकरितां दैवें राज्य भ्रमोनि तो जेवी ३३
तैसाचि पांड्यक्षतही नकरूनि पूजासमाप्ति करि भुक्ती
उक्ति ब्राम्हणि सत्या नाहीं केलें नभोगितां मुक्ती ३४
जो पांड्य पूर्वजन्मीं याजन्मीं तोचि सत्यरथ ज्याला
अरिनीं वधिला नाहीं कांहीं भोगोनि भोग जो धाला ३५
पांड्यत्वीं होता जो सत्यरथत्वींच तोचि हा तनय
झाला दरिद्र यापरि पूजाविघ्नें करून होत-नय ३६
याची माता छद्में पूर्वभवीं निज-सपत्निला मारी
यास्तव नक्रें नेली याजन्मीं दुरित तें तिचें भारी ३७
कथिली विदर्भराज- प्रभुरयांची म्या प्रवृत्ति हे सर्वा
प्राणी दरिद्र होती ते जे प्रेमें नपूजिती शर्वा ३८
सत्य परलोक-हितजें सार उपनिषद्रहस्य जें वदतों
शिवभजन असारभवीं सार मिळे सहज मुक्तिचें पद तों ३९
पूजिति न जे प्रदोषीं शिव-पद-पद्में न वंदिती भावें
श्रवण कथाहि नकरिती सुदरिद्र तिहीं भवीं न कां व्हावें ४०
मर्त्य प्रदोषसमयीं पूजिति अत्यादरें शिवाला जे
तद्विभवा अन्य-विभव बहु जेविं दिवाकरा दिवा लाजे ४१
कैलासीं निज-भवनीं बसवुनि देवी वरासनीं नृत्य
करितो शिव प्रदोषीं पार्श्वीं स्मर शतमखादि जे भृत्य ४२
वाणी वीणा शतमख वेणु चतुर्वदन ताल वाजवितो
श्रीपति मृदंग गाती श्रीरस तो मुक्तितेंहि लाजवितो ४३
गंधर्व यक्ष खग फणि विद्याधर सिद्ध साध्य देववर
सर्व प्रदोषकाळीं श्री-शिव-पार्श्वस्थ नम्र बद्धकर ४४
यास्तव शिव प्रदोषीं पूजावा हाचि आदरें एक
सर्व प्रसन्न होती तरुमूळिं दिला जलादिकें सेक ४५

१ त्यक्तनय- २ सिंचन.+उपनिषत्-रहस्य-उपनिषदांचें तात्पर्य.

तव सुतहि पूर्वजन्मीं नेता झाला प्रतिग्रहेंचि नृपा ॥
उपजत दरिद्र यास्तव तारिल करितांचि भक्ति तो शिव या

---

## अध्याय ७

श्री-शिव-पूजा विधितें नमुनि पुसे ती उमा तितें विप्र
शांडिल्य कथी जेणें व्हावा शिव सुप्रसन्न धी क्षिप्र १
ब्राम्हण-हत्या शतही श्रीशिव-पूजा अशेष वारील
पापी शिवस्वहर्ता त्या एकालाचि हें न तारील २
दोघां शिशूंसि पूजा- विधि तो कारुण्य-तोयराशि कवी
व्हाया प्रसन्न सकला दीनांचा मुख्य सोयरा शिकवी ३
नमुनि उमा त्यासि म्हणे बा आलें शरण हे तुला बाळ
माझा पुत्र शुचिव्रत नृपसुत हा धर्मगुप्त या पाळ ४
शिव-भजन-मंत्रविद्या त्या दोघांनें मुनींद्र तो सांगे
सांखुनि म्हणे उमेनें प्रभु न करिल सेवकीं कृपा कां गे
नमुनि प्रदक्षिण करुनि मुनिस सबाला उमा सती गेली
त्यापासुनि प्रदोषीं शिवपूजा भक्तिनें तिहीं केली ६
करितां प्रदोष-पूजा मासचतुष्टय सनष्टचर्य सरे
दोघांच्याहि मनांत प्रतिदिवसाधिक महेश-भक्ति भरे
द्विज-सुत एके दिवसीं स्नान कराया सरित्तटीं गेला
तों त्या आप्तधनावरि भक्तधनानें प्रसाद हा केला ८
ढांसळल्या वप्राच्या गर्भी पावे निधान-कुंभाला
प्रभुची दृष्टि कुशा तुरटी महिषी जशीच शंभाला ९
आणुनि निधान-पात्र स्वगृहीं मातेसि तें निवेदून
बाळ शुचिव्रत केल्या भगवद्भजनेंहि तो निवेदूनं १०

---

१ त्वरित. २ शिवपूजा. ३ खंदकाच्या. ४ संतप्त.

माय म्हणे घ्या दोघे वांटुन समभाग देवदत्त धन
नलकन म्हणे बरें परि न नृपसुताचें म्हणे अवश्य मन ११
विटला उमा न नृप सुत साधुत्वें जरिहि लंघिला शब्द
त्याउपरि कश्चित असतां शिवपूजन एक लोटला अब्द १२
द्विज-नृप-पुत्र वसंतीं क्रीडत होते वनांत तों धन्या
दूरुनि विलोकिल्या बहु गंधर्वांच्या मनोरमा कन्या १३
विप्रसुत म्हणे फिरतों स्त्रीसंदर्शन नव्हे उचित मातें
पळविति विवेक वळविति भ्रमविति या तत्क्षणीं मुदितमातें
मज मुख्य होय न मळों द्यावें स्वब्रम्हचर्य हें कार्य
दर्शन परस्त्रियांचें परिहरिती जाण धर्म हे आर्य १५
ऐसें बोलुनि विप्र क्षिप्रचि परतोनि दूर तो राहे
कुतुकें जाय पुढें नृप सुत मुख्या कन्यका तया पाहे १६
पुष्पावचयच्छद्में[1] ती सखियांतें वनांतरीं धाडी
एकांतीं गांठि पुरुष-रत्नासीं अतिविचक्षणा पाडी १७
राजसुत निकट येतां देउनि तयासि पल्लवासन[2] ती
चित्तें करी तयाला राधा त्याजेवि बहुवास नती[3] १८
आधीं कुशल मग पुसे वृत्त तिला सर्व सुज्ञ-राय कवी
स्वल्पाऽक्षर बह्वर्थ स्व-सकल*-वृत्तांत तीस आयकवी १९
मग धर्मगुप्तहि पुसे सांगे निजवृत्त ती असें त्या कीं
द्रविडकनामा आहे गंधर्वश्रेष्ठ मत्पिता नाकीं[4] २०
मज अंशुमती म्हणती तुजसीं[5] देखूनि ओलि बोलाया
बसलें मी निज हृदया निववाया त्वत्स्वरूप†बोला या २१
मी संगीत-सुविद्या जाणतसें मत्सुखाकडे अमेरी[6]
देखति बहुमानीं गुण-निरता सौगंधिका[7] जशा भ्रमरी २२

---

१ पुष्प-अवचय-छद्म-फुलें जमविण्याच्या कपटानें. २ गवत्यास (कुशास) ३ प्रणाम. ४ स्वर्गी. ५ सखि. ६ देवांगना. ७ नाम विशेष (कमळ) त्याला. * "स्वसकलवृत्तांत तूर्ण आयकवी" असाहि पाठ आहे. † त्वत्-स्वरूप-ओल-तुझें उत्तम रूप जें तोच आईपणा त्याला.

सकळ-कळा-निपुणा मी सर्वजनेंगित[1] सदा मला कळतें
देवें तुजसीं मजसीं संगति सत्प्रेम जें न तळमळतें २३
ऐसें वदे स्तनांतर-वर्ती मणिहार त्यासि दे हातें
कळवी कृतसंकल्पा अंशुमती द्यावया स्वदेहातें २४
नृपपुत्र म्हणे झालिस सुदति मुदतिशयवती[2] परि स्पष्ट
कष्टयस्त असें मी, गत-पितृ-मातृक नृपासन-भ्रष्ट २५
ऐसा हा विगत-विभव तुज योग्य वरावयासि कां गमला
तत्स्वजनें सेवाया निष्पत्रच्छाय काय सांग मला २६
पितृ-शासन लंघाया तूं बाला पितृमती कसी उचिता
स्वच्छंदाचरणानें राहेना कुलज-कीर्तिची शुचिता २७
अंशुमती त्यासि म्हणे कौतुक होतें पहा कसें आर्य
प्रमुदित होतिल सत्वर सिद्धिस पावेल चिंतिलें कार्य २८
प्रातःकाळीं येथें यावें त्वां म्याहि विहित-संकेतें
स्वछंदाचरणाच्या चित्तांतुनि दूर करुनि शंकेतें २९
ऐसें सांगुनि गेली गंधर्वसुता स्व-तात-सदनातें
नृपसुत शुचिव्रतातें कळवी वृत्त प्रसन्न-वदनातें ३०
त्या वृत्तें धात्रीनें सुखवुनि दुसरे दिनीं तया स्थानीं
नृपसुत शुचिव्रतासह जाय धरुनि ती वरांगना ध्यानीं ३१
गंधर्वेश्वर-सहिता अंशुमती तेथ दखिली होती
जी व्यक्त हृदय-फलकीं प्रथम पहातांचि रेखिली होती
गंधर्वेश्वर सुखवुनि दोघांतें उत्तमासनीं स्थापी
राजसुतासि म्हणे वाक् कर्णाहीं वाक् सुधा-रसा व्यापी ३३
नृपपुत्रा कैलासीं पूर्वदिनीं शंभुदास हा गेला
केला प्रसाद-पात्र प्रभुनें वंदन करूनि जो ठेला ३४
गंधर्वेंद्रा क्षितिवरि नृपनंदन धर्मगुप्त या नावें

---

१ सर्व-जन-इंगित- सर्वजनांचा आशय २ मुद्-अतिशयवती- आनंदातिशयवती-

मद्भजनीं तत्प्रेम ध्रुवशिशुचें जेविं तेविं वानावें ३५
गत-पितृ-मातृक अरि-हृत- राज्य अकिंचन सदा मला भजतो
तत्पितर मुक्त झाले परिपाल्य प्रिय तनूजसा मज तो ३६
तत्साह्याय्य करीं तो मर्दुनि सकला अरींस हो राजा
जयदा माझी आज्ञा अधिक नसे यापरीस हो राजा ३७
ऐसी आज्ञा होतां मी नमुनि त्रिपुर-काम-कदनातें
कैलासाहुनि आलों त्वत्कार्योत्कंठित स्व-सदनातें ३८
तों या कन्येनेंही केली मत्प्रार्थना पुरुषरत्ना
देतों मी हे आर्धी मग राज्यश्री तुला करुनि यत्ना ३९
स्वपुरीं अंशुमतीसीं वर्षायुत भोग भोगुनि प्राज्य
श्रीशिवलोकीं वससी धर्मन्यायें करूनि तूं राज्य ४०
यापरि बोलुनि विधिनें दे हा गंधर्वराज कन्या या
धन्या यागादि महा- धर्म जसा चित्तशुद्धिस न्याया ४१
चंद्रप्रभ चूडामणि मुक्तामणि-हार वर अलंकार
सारस्वर्ण-परिच्छद दे दिव्यें अंबरें तया फार ४२
गज अयुत नियुत वाजी कांचन रथ बहुसहस्र दे त्यातें
दिव्य स्यंदनहि दिला पात्राऽर्पित बहु गमे न दे त्यातें ४३
शक्रायुध-सम कार्मुक शस्त्रास्त्रें बहुसहस्र जे भाते
पूर्ण शराऽभेद्य कवच दे शक्तिहि जे धरी मेहें भाते ४४
दे धन्या सहस्र कन्या निज-दुहितेची करावया सेवा
देउनि विविध धन म्हणे तो पावो हें महेश्वरा देवा ४५
तत्साहित्य कराया दे धर्ले गंधर्व-सैन्य चतुरंग
वश असतां वेगळिता तो सागर जन महेभ न तुरंग ४६
शिव-भक्त-नृप-सुतासीं लावुनि सुख-कीर्ति-कारि नव नातें
बसुनि विमानीं गेला तो गंधर्वेश्वर स्व-भवनातें ४७

---

१ मुहूर्त. २ उत्सवानें. ३ तेज. ४ आपल्या कन्येची.

प्रमुदित शिव-प्रसादें झाला तो धर्मगुप्त मग अरिला
मारुनि निज-पद साधी जो कीर्ति-श्री तिहीं रुचिर वरिला ४८
करितां राज्य स्वपुरीं स्वसमचि केला रुचिव्रत भ्राता
मातासीच उमा ती हर्षविली जी हरी श्रमव्राता ४९
श्रीशंभुतें प्रदोषीं आराधुनि धर्मगुप्त तो तरला
अन्यहि तरेल या परि शिव-भजनीं पळहि मति न हो वरेला
आराधिला प्रदोषीं श्रीशिव होऊनि सादर जनांहीं
त्यांचें करितें स्पर्शनि जेगदघ तत्काळ पाद-रज नाहीं ५१
हे सत्कथा यथामति रामरुतें लिहुनि वाहिली देवा
प्रभुचा प्रसाद व्हाया बुध म्हणती हेचि बहु बरी सेवा ५२

---

## अध्याय ८

श्रीशिव-पूजा नियमें संतत जी सोमवासरीं केली
ती तसा जीवातें नियविति जैसी रुधारसीं भेली १
बटु कीं गृहस्थ नारी सधवा विधवा कुमारिका तरती
संसार-ताप सर्वहि शशि-वासर-कृत-शिवार्चनें सरती
आर्यावर्तीं होता श्री हरि-हर-भक्त साधु भूभर्ता
प्रख्यात चित्रवर्मा या नामें शत्रु-संपदा-हर्ता २
कृत-रत्नातें पावे परि तो संतत म्हणे मला धन्या
कन्या व्हावी देवा या संसारीं स्पृहा नसे अन्या ४
श्रीहरि-हर-प्रसादें झाली चिरचिंतिता अपीतनया
ब्रम्हण-पूजन-सक्ता हरि-हर-भक्ता तया नृपा तनया
हिमगिरि जसा उमेतें हर्षे पावोनि भूप मुलगीतें
कन्यारत्नेंहि निचे साधुयशें जेविं साधु-कुल-गीतें ६

---

१ श्रमसमूहा. २ चंचला. ३ जगत्-अघ-जगाचें पाप. ४ सुवर्णचेढपीचा तुकडा. ५ ब्रम्हचारी. ६ नामविशेष (विंध्य आणि हिमालय यांमधील प्रदेश). ७ इच्छा. + नाहीं शकिली नीति जिणें असी.

संस्कार करुनि ठेवी तीचें सीमंतिनी असें नाम
त्याच्या होता कन्या- दानाचा मानसीं महा काम ७
एके दिवसीं राजा द्विजजातक-लक्षण-ज्ञ आणून
त्यानें पुसे मुलीचें सांगा स्वामी भविष्य जाणून ८
एक बहुज्ञ मुनि म्हणे नामें सीमंतिनी तुझी कन्या
मंगलवती उमा जसि दमयंती तेवि रूपिणी धन्या ९
होइल स्व-कलाभिज्ञा हे साक्षात् भारतीतसी[1] दुहिता
लक्ष्मीनसी महा-गुण-गण-संपन्ना कुलद्वयेंदुहिता[2] १०
अदिति तसि सुप्रजा हे संततहि धृतव्रता जसी सीता[3]
रविरुचि तसि प्रकाशें चित्तहरी चंद्रिका तसी सीता[4] ११
नांदेल अयुतवर्षें पतिसह होतील सुत इला अष्ट
कष्ट प्रेक्षील न हे कन्या पावेल बहु सुख स्पष्ट १२
ऐसें ऐकुनि राजा दे वस्त्रें भूषणें विपुल वित्तें
पूजी सद्विप्रातें वदुनि अत्यादरें मुदित-चित्तें १३
अन्य मुनि म्हणे राजा व्हाया कर्णांसि हर्षच वदावें
परि विधवा होइल हे होतांचि प्राप्त वर्ष चवदावें १४
तें ऐकुनि नृप झाला चिंता-व्याकुल मुहूर्त तो भ्याला
त्या मोही कन्येचा घात श्रीचा जसाचि लोभ्याला १५
विप्रातें विप्रानुग[5] तो राजा नमुनि दे निरोपातें[6]
ते वदले हा ब्राम्हण- भक्त न चिंतार्णवीं शिरो पोतें १६
सर्वहि देवयज्ञा असें मानुनि निश्चिंत भूप तो होय
तापे बहुत परि निवे सुज्ञाचें हृदय तें जसें तोय १७
परिसुनि निज-वैधव्य स्व-सखी-वदनें विशीर्णशा[7] बाला
बोलाया लागे ती लावी तो दोष आपुल्या भाळा १८

१ सरस्वतीसी २ कुल-द्वयें- इंदु- हिता-बापाचें आपलें जें कुल द्वय तोच चंद्र त्याची हितकर्ती. ३ जानकी. ४ चंद्र असी- ५ ब्राम्हणसेवक. ६ पतनानें. ७ गेलें शिथुलजीचें असी

पाहुनि निर्वेद तिणें जाउनियां शरण विनविली आर्या
श्री-याज्ञवल्क्य मुनिची श्रीमैत्रेयी महासती भार्या १९
माते सांगावें मज जेणें सौभाग्य-वृद्धि तें कर्म
धर्मज्ञे उपदेशुनि हित या निजकन्यकेशि दे शर्म २०
सीमंतिनी असें जें चरणीं घालुनियां मिठी वदली
पदलीनेवरि करुणा-कर्पूराची द्रवे सती कदली २१
मैत्रेयी तीस म्हणे जा शिवयुक्तांऽबिकेसि तूं शरण
श्री-गौरी-हर-पूजा शशिवारीं नित्य करित जा स्मरण २२
प्रातःस्नान उपोषण करुनि पुन्हा स्नान विरज वस्त्र धरीं
मौन वरीं शिव पूजा होउनि निश्चल-विशुद्ध-बुद्धि करीं
करुनि ब्राम्हण-भोजन मग आपण शेष अन्न भक्षावें
सांब प्रसन्न होइल स्वव्रत हें बहु जपोनि रक्षावें २४
पापक्षय अभिषेकें साम्राज्यहि पीठ-पूजनें लाहे
सौभाग्य सर्व सौख्यहि गंधाक्षत माल्य अर्पितां आहे २५
धूपें सौगंध्य मिळे दीपानें कांति जे महा भोग
ते नैवेद्यें मिळती श्री-शिव-पूजा असा नसे योग २६
तांबूलार्चन दानें लक्ष्मी-धर्मार्थ-मोक्ष जे काय
त्यांचें साधन वसे वंदावे सांब-मूर्तिचे पाय २७
पंचाक्षर-जप-साधक अष्टैश्वर्यादि सिद्धि ज्या यांचा
होम मनोहर भर्ता त्या काम-समृधिरूप-जायांचा २८
वसे सर्व-स्फरांतें होतो बहु विप्र-भोजनें तोष
नासेचि सोमवारीं सर्व श्री-सोम-पूजनें दोष २९
शिव-पूजन-प्रभावें तरसिल भवसिंधु शक्य जें मुनिनीं
तें कथिलें सिद्धि सदा लोकनि भव-भक्ति-सुरसरित् पुलिनीं
यापरि सदुपदेशें नृपजा करि सांब-पूजनारंभा

१ स्फरव. २ शुद्ध. ३ संतोष. ४ कन्यानीं.

ज्याची स्मृतिहि अलभ्या दुर्दैवां भूजनां जसी रंभा ३१
पुण्यश्लोक-नवाचा सुत नामें इंद्रसेन तत्तनय
चंद्रांगद आल्हाद- प्रद जो सर्वांसि जेविं दत्तनय ३२
तो भूप चित्रवर्मा देती सीमंतिनी निजा तनया
अनयाऽधर्म-पराङ्मुख- चित्ता बहु मानिती महाजन या ३३
त्या उत्सवांत झालें सुख बहुतचि सर्व-भूप-समवाया
कवि म्हणति रति-स्मर ते अवतरले लोक-दृष्टि रमवाया
तो चंद्रांगद कांहीं- काल निज-श्वशुर-मंदिरीं राहे
आधी विश्वासहि ती बाळा सीमंतिनी मनीं वाहे ३५
नौरिवरि चढुनि क्रीडे यमुनेंत सजूनि मित्र-वर्गातें
नौकेसहित बुडे तो निंदाया जडजनांत भैर्गातें ३६
असु-गणचि तो बुडाला सहसा सह-चित्रवर्म-लोकींचा
कवि म्हणति सार्वभौमचि झाला हा शोक सर्व-क्लेशांचा ३७
त्या वार्तेनें मूर्च्छित पडली सीमंतिनी जसी कदली
माता सखियाहि तिच्या किंबहुना हो असें पुरी वदली ३८
तो इंद्रसेन ऐकुनि पुत्राची परम दुःसहा वार्ता
रडला मूर्छित पडला बहुशोकें होय तत्पुरी आर्ता ३९
कन्येसि चित्रवर्मा नाना यत्नें करूनि समजावी
गुरु-संकोचें न रडे कैसी लंघूनि शोक-तम जावी ४०
राजा जामाताची प्रार्थुनि तद्बांधव क्रिया करवी
सीमंतिनी शिवार्चा तैशा शोकींहि चालवी बरवी ४१
त्या दुःसह-सुत-शोकें सर्वहि होता प्रताप तो हरिला
नृप इंद्रसेन सहसा दायादानीं सदारही धरिला ४२
त्यातें देते झाले दायाद करूनि बंधकारी ते
वद के साधु उपेक्षा कैसी करितोसि अंधकारा ते ४३

१ सर्वराजसमुदाया. २ शिवालें. ३ हाय. ४ पीडिता. ५ बंदिशाळा. ६ हेशंभो. ७ नौकेवर.

यमुनाजळीं बुडाला चंद्रांगद जो तयासि पाहून
घेउनि गेल्या उरगी पाताळीं हार तेथिं वाहून ४४
देवेश्वर-मंदिरसें कांचन-मणि-रचित नागपुर पाहे
तो जोडुनि हस्त उभा सर्पेश्वर-तक्षकापुढें राहे ४५
आला कुमार कोठुनि कोणाचा कोण हा असें भर्ता
सर्पांचा तक्षक तो पुसताझाला स्वयें कृपाकर्ता ४६
उरगी वदल्या निज-पद- पद्कापासूनि सुमणि हा ढळला
क्रीडा करितां आम्हां कालिंदीच्या जळांत आढळला ४७
कुळनाम सांग ऐसें अभयद फणिपाळ तक्षक विचारी
त्यातें स्ववृत्त मौक्तिक जेसें हंसासि दक्ष कवि चारी ४८
पुण्यश्लोक निषध-पति नळ तत्सुत इंद्रसेन या नावें
तत्सुत चंद्रांगद मी त्यांहीं धर्में तसेंचि मानावें ४९
क्रीडा करितां झालों यमुना-नीरांत मग्न परि सावें
आलें धन्यत्व तुझें देणें लोहासि जेथिं परिसावें ५०
पुसिलें मद्वृत्त मज श्रवणहि तें सांग तों स्वयें केलें
झालों धन्यचि दुःख न कोणाचें महदनुग्रहें गेलें ५१
त्या सूक्तें धैर्यगुणें होवुनि परम प्रसन्न तो डोले
तक्षक आराध्य पुसे चंद्रांगद तेधवां असें बोले ५२
नागेंद्रा मद्दैवीं आराध्य श्रीसदाशिव स्वामी
वा मी बहु काय वदों जिव्हा प्रभुच्याचि रंगली नामीं ५३
तक्षक म्हणे सुकुलजा जाणसि पर शैव तत्व तूं धन्य
झालों प्रसन्न पाहुनि तुज तुजसम नर न देखिला अन्य ५४
रविसम मणि या लोकीं मणि-कांचन-मंदिरें सुधावापी
येथें हे कल्पद्रुम सुकृती येथें वसे नसे पापी ५५
येथें मृत्यु-भय नसे रोग-जरा-स्पर्श या नसे लोकीं

---

१ यमुनेच्या. २ भक्षणकरवी. ३ अमृताच्यातळ्या.

येथें स्त्रिया सुरुचिरा नबुडे स्वप्नींहि यास्थळीं शोकीं ५६
या रत्नमय-स्थानीं भोगित सुखभोग जेथिं देव रहा
झालों परम तव सखा आण शचीचा सभाग्य देवर हा ५७
नृपसुत म्हणे अहींद्रा शिव-भक्ता वंशजा वधू आहे
साहे विरहा न सती कांत-रहित विश्व शून्य कीं पाहे ५८
प्रिय एकचि मी झालों प्राणादि पदार्थ नावडे इतर
समजुनि मृत पुत्र कसे मजवांचुनि वांचतील ते पितर ५९
ठेउनि माथां सदया फिरवुनि करपद्म पाठिवर हा या
लोकाहुनि नरलोकीं आम्हांचे प्राण पाठिव रहाया ६०
देवला तक्षक आज्ञा करि सत्कारावयास कन्यातें
त्याचें पूजन केलें स्वर्गीं जें प्राप्त होय धन्या तें ६१
न्हाणुनि सागरु रागें चर्चुनि कल्पद्रुमोद्भवें सरसें
अन्नें सुतृप्त केला त्या अहिपुर होय विष्णुचें पुरसें ६२
उत्तम वस्त्रें उत्तम रत्नाऽलंकार यास दे हातें
तक्षक लक्ष-कवि-स्तुत तो शोभवि शिवचि दास देहातें
कामग तुरंग दे वर- वस्त्रांचा राशि अष्ट मणिभार
वाहक-रक्षक संगें एक फणिकुमार चतुर जो फार ६४
स्मरतां भेटेन असा वर देवुनि दे निरोप मग यांतें
नमुनि निघे चंद्रांगद यश मिरवी शंभुभक्ति न गया तें ६५
यमुना-जळांत जेथें झाला होता निमग्न तो वीर
चंद्रांगद तेथूनचि बाहेर निघोनि पावला तीर[२] ६६
हय फेरित होता जों नों घेवुनियां समागमें आली
तीं वर्षांनीं स्नाना - करितां सीमंतिनी सती आली ६७
सीमंतिनी अकस्मात दिव्याऽलंकार-गंध-धर पाहे
राहे चकित म्हणे हा कोण परम रुचिर पुरुषवर आहे ६८

---

१ सत्कातें २ सखि

ओळखिली नळ-पोत्रें जरिही सौभाग्य-भूषणें हीना
ती नाथापरि नेणें अतिरोदन-मंद-दृक्-प्रभा-हीना ६९
सीमंतिनीनिकट तो येउनि हरिवरुनि उतरला पुलिनीं
बसुनि जवळ बसवि तिला सचकित होऊनि पाहिलासुलिनीं
तीस पुसे कोणाची स्त्री कन्या नाम काय शोकाचें
लक्षण बाळपणीं कां हें गरळचि होय आप्त-लोकाचें ७१
ऐसें स्नेहें पुसतां साश्रुमुखी लाजली कथायाला
सांगे नकरुनि विस्तर सुमति तिची प्रियसखी कथायाला
दुःख तिचें श्वशुराचें केवळ दुःसह अदोष आयकवी
न उरायाचें जरि तें तरि तेव्हां तो म्हणेचि हाय कवी ७३
आयकिलें शिव-पूजा-व्रत नत्यजिलें असें तिचें उक्त
चित्तांत मृत्युपाशा-पासुनि केलें इणें म्हणे मुक्त ७४
सीमंतिनी म्हणे प्रिय-दर्शन तूं कोण मनुज कीं देही
स्मर मज गमसी साधो पुरुषवरा पूर्वदृष्ट हा स्नेही ७५
इतुकें बोलोनि सुचिर शोकार्त्ता राजनंदिनी रडली
सांवरिली सखियानीं मोहभरें सुतनु जेधवां पडली ७६
सांत्वन अतिनिपुणपणें करुनि म्हणे न वद सर्वदा साहें
पुससी कोण म्हणुनि जरि तरि कामग सिद्ध देव मी आहें ७७
कर धरुनि बळें ओढी तों पाणिग्रहण-शंकिता झाली
त्याली रोमांचातें हस्त-स्पर्शामृतें सती धाली ७८
कर्णीं सांगे त्वत्पति चंद्रांगद देखिला सखा मम तो
गतकांति वह्निरहें रात्रि-वियोगें शशी तसा गमतो ७९
भेटेल क्षिप्र तुला तेणें तव उग्र दुःख आठविलें
देवि तुजकडे मातें त्वत्ताप-निवारणार्थ पाठविलें ८०
येथें संदेह तुवां न धरावा सत्य हें न पथ करितों

---

१ घोड्यावरून. २ वाळवंटीं.

लटिकें सांगे मी श्री-शिव- चरणाचाही पहा शपथ करितों ८१
तों वरि न प्रकटावें महाभ्य नवीच हूं असो दे हें
विश्रांत यथोरूपें कोठुनि आह्मीं तुम्हीं वसो देहें ८२
वाक्य सुधावर्षाहुनि समधिक सीमंतिनीस तें वाटे
आटे शोक समग्र ब्रम्हांडीं हर्ष तत्क्षणीं दाटे ८३
वारंवार प्रेमें पाहे चंद्रांगदाकडेचि सती
तीस तसिं पूर्वदृष्टें सिद्ध शरीरांत लक्षणें दिसती ८४
वय तेंचि वर्ण तोचि स्वर तोची सुरतिही पहाण्याची
हाचि तिला स्वपति गमे जाणे मति परिचिता शहाण्याची ८५
स्वमनांत म्हणे माझें या नररत्नींच लागलें चक्षु
मज वाटतसे प्रेमें सादर ऐसेंचि यास हें लक्षु ८६
धरुनि स्वरूप आला परलोकाहूनि काय हा कांत
परि दुर्भगेसि ऐसा झालाच कधीं नसेल शोकांत ८७
स्वप्न नव्हे भ्रमहि नव्हे गंधर्वादिक असेल हा धूर्त
आला मज ताराया मैत्रेयीचा प्रसाद कीं मूर्त ८८
तो सत्य काय वद्ला द्विजजातक-लक्षण-ज्ञ जो पहिला
नकळे प्रभु-चरित करी लीलेनें रत्नहार तो अहिला ८९
बहु वाम- बाहु-नेत्र- स्फुरणादिक विविध हिनिंहिनिं स्पष्ट
मंगल-निमित्त दिसतें याच्या जावेचि दर्शनीं कष्ट ९०
शंभु प्रसन्न होतां आपणास असाध्य मुक्तिही नाहीं
मग नवल काय बहु जरि अनुभविली भुक्ति मुक्ति ही नाहीं ९१
ऐसें बहुधा चिंतुनि सुमति पुन्हा युक्त-संशया झाली
लज्जा-भर-नम्र-मुखी पडुनि सुखामाजि आलिही घाली ९२
तो तत्कर्णांत पुन्हा सांगे शोकार्त पितर जि घबाया
जातों साधिं तुज तुजा शीघ्रचि भेटेल कांत निवबाया ९३

१ प्रभु.

त्यापरि भेटुनि बोलुनि गेला अर्थीं वसोनि कामगमीं
तोचि बहु विनोद करी अजि कां न म्हणों असो विकल मनीं ९४
स्वपुरोपवनीं उतरे चंद्रांगद नत कृशावया द्वेषी
त्या नागकुमारावें कळवाया स्वप्रताप तो प्रेषी ९५
फणिपुत्र म्हणे जोडा कर आर्यां इंद्रसेन नृप सोडा
आला चंद्रांगद या विनवा अपराध हा नव्हे थोडा ९६
यमुनेमाजि बुडाला तो आला तक्षकालयाहून
हा शिवभक्त म्हणा न क्षम संहृति-दक्ष काळ याहून ९७
चंद्रांगद आला हें कळवी फणिपुत्र इंद्रसेनातें
जे नातें सोयपदीं लाविति त्यां काय काय देनातें ९८
बहु साधु साधु वदले झाले जरि परम दुष्टही अरि ते
न रिले पडतील कसे शिव-भक्त-स्वापहार जे करिते ९९
पौर प्रधान गेले सपुरोहित उपवनासि आणाया
चंद्रांगदासि भेटति निज-शोकद्रुम समूळ खाणाया १००
सत्कारुनि हर्षभरें बहुतचि विनवीत जलधिवसनेला
तो चंद्रांगद नगरीं जाणों धृतमूर्ति अमृतरस नेला १०१
बहु इंद्रसेन हर्षे नशके तनयासि ओळखायाला
मायहि जीस उरक्षत जाया लागे न बोळ खायाला १०२
राजा म्हणे सुनेच्या सुकृतें तरलों नसे दुजा हेतू
जें भव्य सोमवार-व्रत तें या शोकसागरीं सेतू १०३
हें वार्तामृत धाडी त्याला होता करून आ व्याही
जो नृप चित्रवर्मा मानी स्वाधिक न तस आव्याही १०४
सीमंतिनी-पिता दे स्वसभालंकारराशि जासूदा
श्वशुरें म्हणे मम-कनक पावांनचि वाढ यासि जा सूदा १०५

---

१ स्व-पुर-उपवन-आपल्या घराजवळील बागेंत. २ समर्थ. ३ संहारदक्ष. ४ पृथ्वीला. ५ घागरी नउकी इत्यादि भाजण्याला डोंजी भटी लावितात त्यालाहि. ६ सैंपाक्या. + मनास वाटेल तिकडे जाणारा.

सर्व हि रूकविजन तया वर्णुनि निःसीमउद्ध्वास[1] वदे
कोणी म्हणति प्रकटुनि आनंद असाचि शुद्ध वासव दे १०६
मातांचा सखियांचा पुरवनितांचा प्रमोद-अर्णव तो
मग त्या राजसुतेचा मजरेश्वा कविस काय वर्णवतो१०७
सीमंतिनीस लाविति कुंकुम घाली प्रियालि[2] नथ नाकीं
कोणी वेणी कज्जल गाती देवर्षि चित्ररथ नोकीं १०८
तो नृपनि चित्रवर्मा स्वपुरातें आणवुनि तथा धन्या
चंद्रांगदासि देता झाला विधिनें महोत्सवें कन्या १०९
चंद्रांगदें रूवस्थें देव-द्रुम-पुष्प-भूषणें भव्यें
अम्लानें बहुवर्णें नानाश्वर्यप्रदें सदा[4] भव्यें ११०
रत्नाऽलंकार-शतें तक्षक-दत्तें स्वयेंचि शोभविली
दृष्टिना महांगरागें दशयोजनगेंहि फार लोभविली १११
दे भूप चित्रवर्मा जाया स्वपुरा सदार आज्ञा त्या
निववुनि सर्वांसि निघे प्रेमें वंदुनि पुसोनियां ज्ञात्या११२
पुत्रासि राज्य देउनि गिरिशातें इंद्रसेन तो भावें
मुक्त भजुनि होय प्रभु-भजनें विश्रांत सुयश शोभावें११३
अष्ट सुत प्रसवे सुख भोगी सीमंतिनी अयुतवर्षें
शिवलोकीं जाय भजुनि पतिसह परमेश्वरासि बहुहर्षें११४
लिहिली कथा यथामति हे श्रीरामात्मजें अघ सराया
अत्युच्चपदापासुनि गातां जनही कधीं न घसराया११५

---

## अध्याय ९.

श्री-शिव-कीर्त्यमृत-रसीं वादाया सर्वदा रुचि तगाया
बहु हाहि सोमवार-व्रत-महिमा कविजना उचित गाया१

---

१ मर्यादारहितउत्सवास. २ प्रियसखी. ३ स्वर्गी. ४ सर्वदाकल्याणदायकें.

होते विदर्भदेशीं सारस्वत वेदमित्र या नावें
ज्यां श्रुति-शास्त्र-ज्ञातें बहु धन्य असें सभेंत वानावें २
ते परम सखे दोघे झाले दोघांसि आत्मभव दोन
हेहि सखे प्रकटिति गुण वृत्तेंचि मुखें स्वरूप न वदोन ३
श्रुतिमित्र-सुत सुमेधा सारस्वत-पुत्र सामवान् सुकवी
षोडशवर्षांचे परि वेदीं शास्त्रीं न पर जयां चुकवी ४
वदले तात तयांतें सुखवूनि विदर्भ-राज चित्तातें
जा स्वविवाहा करितां संपादा तूर्ण पूर्ण-वित्तातें ५
ताताते वंदुनि ते वित्तार्थी त्या विदर्भ-भूपालें
जाउनि भेटति दोघे ते पांथीं पांथ जेविं कूपातें ६
तोषउनि स्वगुणांहीं धन नाहीं संग्रहीं विवाहातें
स्वाश्रय याचिति शब्दें अर्थ जसा धरुनियां दिवा हातें ७
स्मित करुनि वदे राजा जाणावें लोक-तत्व या भावें
बुधहो कथितों एका युक्ति जिणें वित्त विपुल लाभावें ८
एकें वेष धरावा स्त्रीचा होऊनि दंपती जावें
सीमंतिनी करितसे मिथुनार्चा सोमवासरीं भावें ९
निषधेश्वर-चंद्रांगद त्याची सीमंतिनी भली भार्या
करिती दंपत्यर्चन रत्नालंकार वाहती आर्या १०
विप्र म्हणति अनुचित हें शुद्धांसचि सेव्य नृपतिचें सद्म
कुष्ट जसें रूपातें प्रकटुनि दूषील सद्यशा छद्म ११
भय-पाप-वैर-निंदा-पात्र छद्में प्रवर्तता होतो
जो धूर्त-श्लाघ्य कुपथ कुलजा होईल मान्य कां हो तो १२
भूप म्हणे देव पितर गुरु पृथ्वीपति समर्थ हे चवघे
लोकीं अलंघ्य-शासन भय देती उक्त न करितां अवघे १३
अविलंबित कथित करा प्राप्त असे अन्यथा भय व्यक्त

---

१ उदकीं. २ कपट.

शुभ अशुभाहि ऐकावें आम्हीं राजे प्रजा तुम्ही भक्त १४
या नृप वचनें झाले ते साधुस मान्य बाल-कवि याला
म्हणती आवश्यक कीं सत्यचि सम भूमि पालक विर्याला १५
स्त्रीवेष भूप दे जो सारस्वत-पुत्र सामवान् यातें
स्तन केश करी कृत्रिम लावी कज्जलहि वृद्ध मान्या तें १६
द्विजसुत सुंदर होता स्त्रीवेष दिला विचक्षणें भूपें
प्रौढांगनाहि त्याच्या त्या भव्यें मोह पावल्या रूपें १७
या मजकडेचि आधीं ऐसें सिकवुनि विदर्भ-भूपानें
सीमंतिनीकडे ते पाठविले दंपती-स्वरूपानें १८
होयिल तें हो ऐसें चिंतुनि ते निषधपति-पुरा गेले
यापरि विदर्भपतिनें वश विधिनें विप्रसुत सुकवि केले १९
सस्त्रीक ब्राम्हण जे त्यांसह शिरले नृपालयीं क्षिप्र
सीमंतिनी समर्चीं सद्विधिनें सोमवासरीं विप्र २०
बहु मैहुणें स्वरीं जीं त्यांतचि ते दंपति स्वयें पाहे
स्मित करुनि सांब शिव या भावें शिर तत्पदांबुजीं वाहे २१
त्या मिथुनीं आवाहन सांबशिवाचें करूनियां भावें
पूजन विध्युक्त करी जें बहु अद्यापि साधुनीं गावें २२
विप्रीं करी शिवाचें आवाहन पूजनीं तसेंचि सती
त्यांच्या स्त्रींत शिवेचें तद्रूपचि तीस दंपती दिसती २३
पूजन करितां प्रेमें सद्वस्त्रें भूषणेंहि लेवविलीं
मिथुनें कांचन-पात्रीं विविधान्नें ओगरूनि जेवविलीं २४
तांबूल दक्षिणा मग देउनि करुनि प्रदक्षिणा नमुनी
[illegible]थुनें विसर्जिलीं तीं गेलीं त[illegible] रमुनी २५
[illegible]थ सामवान् स्त्री राज्ञी जेथें शिवे [illegible] आवींही
आवाहनीं शिवातें तरि होती दिव्य पुरुष आवाहीं २६

१ दैवानें. २ वाढून ३ विधवा स्त्रियाहि. ∗ आवाहन करी # दंपत्यें. + प्रसवला ८ वाघ इत्यादि.

पूर्व पुरुषपण विसरे तो मन्य स्त्रीच आपणा समजे
संगार्थ सुमेध्यासीं भार्गवनामा करी बहुत गमजे २७
यापरि बोले नाथा कामार्ता बहु तव प्रिया हे मी
तव-अधराऽमृत-पानें वांचेनचि वृद्धि बहु असो प्रेमीं २८
मर्त्या रहा पहा वन रम्य करीं यांत मजसह क्रीडा
एकांती दयितेसीं रमति सुखें दयित सोडुनि व्रीडा २९
हें ऐकोनि सुमेधा चित्तांत म्हणे विनोद ऐसा या
की रुचला योग्य न हे हा परिहास-स्थळीं हि बैसा या ३०
अश्रुतपूर्व सुमेधा श्रवण करुनि तो पथीं उभा राहे
पाहे तों सारस्वत-पुत्र स्त्री स्पष्ट जाहला आहे ३१
विस्मय पावोनि पुसे रूप-गुणाढ्यीं अपूर्वसा मित्रा
दिससी वदसी वाणी मद-विकळा कामिनी तशा चित्रा ३२
तूं सामवानु मम सखा पंडित वदसी असें कसें भलतें
माझ्या हृदयांत तुझें बहुतचि हें आजि बोलणें सलतें ३३
तो बोले पुरुष नव्हे सामवती स्त्री रतिप्रदा आहें
संशय असेल तरि तूं माझीं आंगें प्रिया स्वयें पाहें ३४
ऐकुनि असें अहृत्रिम- केश-स्तन-जघन-शोभनी पाहे
वाहे विकार पळ परि साधु सुमेधा स्वसत्पथीं राहे ३५
सामवती त्यासि म्हणे गेला कीं संशय प्रभो वद या
स्वस्त्रीतें रमिव शमिव कामज्वर परथनीं प्रिया सदया ३६
पुनरपि म्हणे सुमेधा मोडिसि रीतीस जेवि मत्त महा
मर्यादेसि बुडवितां म्हणनात कुलीन साधु सज्जन हो ३७
आम्हीं शास्त्र-निपुण कीं वदतोसि असा कसा महादोषा
रे समज आपणातें आपण की पुरुष बुध न तूं योषा ३८
न धरावा अपथ असा साधूंच्या नायकोन हाकेला

१ लज्जा. २ हाव. ३ स्त्री.

आम्हीं स्वयेंचि होउनि धूर्त-नृपा वश अनर्थ हा केला ३९
सद्गुण-मंडित पंडित- बहुमत होतासि नाकपाळाला[1]
ऐशाहि तुज्या आला निंद्य स्त्री भाव हा कृपाळाला ४०
त्यजुनि पथ वनीं फिरतां सांपडतो स्पष्ट हा दवा[2] खातो
कीं व्याघ्रादिक पावे कीं कंटक-विद्ध-पाद वाखवा तो ४१
धरुनि विवेक स्वगृहा तूं चाल उगाचि न धरितां ताप
देव-द्विज-प्रसादें जायिल विलयासि हें तुझें पाप ४२
अथवा विधिच्या योगें होउनि जरि राहसील तूं नारी
तरि माझा बल मोठें त्या शङ्गीचा प्रभावही भारी ४३
बहु वारी परि त्यातें ती आलिंगुनि बळेंचि मुख चुंबी
मानी मनीं सुमेधा अमृत-लतासी तथापि कडुतुंबी[3] ४४
ऐसें धर्षण केलें तरि न सुमेधा सुधीर तो चळला
कळला अनर्थ भारी न तिला रंभेसि शुकतसा वळला ४५
चलें गृहासि घेउनि मेला नूतन वधू सुमेधा ती
हृदयीं म्हणे तव-यशें सुब्राम्हण वत्सके उमे धाती[4] ४६
नमुनि सुमेधा ताता तात-सख्या सर्व वृत्त आयकवी
ससुत विदर्भपतिकडे ते गेले क्रोध-तप्त- काय कवी ४७
सारस्वत विप्र म्हणे राया अद्भुत कार्य कां गमला
एकचि सुत तद्गति हे मज नमुचे तूं विचार सांग मला ४८
त्वन्मंत्रें पुत्राचें झालें श्लाघ्यहि वपु त्रपाकारी[5]
राजा म्हणेल चि सदा हाहा होतां अपुत्र पाकारी[6] ४९
राजा स्वरूप जातां
परहितचि किमपि न कळे स्वहितचि कैसें तुला सकळ कळतें ५०
एकचि पुत्र तयाची गति हे मत्सम दुजा नसे कष्टी
वैदर्भा अंधाची मोडावी काय डोळसें यष्टी ५१

---

१ इंद्राला. २ वणव्या. ३ कडुभोपळी. ४ तृप्त होती. ५ लज्जाकारि. ६ इंद्र.

ब्राम्हण-सुत-विनाशें कडकडला भूप संकटीं पडला
घडला अपराध म्हणे अयशाचा डाग आपणा जडला ५२
सीमंतिनि-प्रभावें भूप परम-विस्मयासि तो पावे
मेळवि महर्षि ज्यांहीं सद्गुर शरणागतासि ओपावे ५३
पूजुनि नमुनि नृप म्हणे पदर पसरितों महर्षिंहो तारा
वारा या सारस्वत-पुत्राचें स्वीत्व मज तुम्हीं वारा ५४
ते वदले शिव दुर्गा तद्भक्तहि अति समर्थ वाराया
यांच्या संकल्पातें क्षम कोण त्रिभुवनांत वाराया ५५
मग नरवरें प्रयत्नें सुमुनि भरद्वाज नमुनि आणविला
त्याला प्रार्थुनि तेणें आपण केला अनर्थ जाणविला ५६
द्रवुनि भरद्वाज महा- मुनि सिकवी संकटांत सारा धी
त्या सात्मज-विप्रासह नृप भावें भगवतीस आराधी ५७
ध्यान-जपार्चन-नमन-स्तवन-रत त्यजुनि भुक्ति तो भावें
नृप तोषवी त्रिरात्र श्रीदुर्गेतें म्हणे मला पावें ५८
तीव्र-नियम-संतुष्टा शशि-कोटि-समप्रभ स्वरूप नृपा
दावी श्रीजगदंबा शरणागतवत्सला करूनि कृपा ५९
दर्शन देवुनि देवी त्यासि म्हणे पसरितोसि पदरा ज्या
हृदयीं धरुनि मजपुढें त्या आत्मसमीहितासि वद राजा ६०
स्तवुनि नमुनि भूप म्हणे भगवति भवसागरांत नाशवें
सारावें अपयश या विप्रसुताचें वधुत्व वारावें ६१
जगदीश्वरी म्हणे मम- भक्तांहीं कर्म जें नृपा केलें
तें अन्यथा कराया शक्य नव्हे वर्ष-लक्ष जरि गेलें ६२
ममभक्तांचें केलें कर्म जगीं मोडिलें कधीं नाहीं
आतां काय करावें या आम्ही भक्तवागधीनाहीं[1] ६३
भूप म्हणे एकात्मज हा द्विज झालाचि नष्ट-संतान

1 भक्त-वाक्-अधीन-भक्ताच्यावाणीच्या स्वाधीनाहीं.

विश्वेश्वरि तुज नमितां बाधे कोणाहि कष्ट संता न ६४
झाला अपुत्र देवें देवि कसा स्वर्ग यासि साधेल
या नष्ट-संतति-मुनिस संसारीं ताप नित्य बाधेल ६५
वर्णिति वेद मुनि तुतें वरदे परदेवते सदाधारे
शरणागतासि म्हणती स्वसद्-पद्में सुखें सदा धा रे ६६
देवी म्हणे प्रसादें माझ्या होइल सुपुत्र या एक
निवविल बहु तो राया दवदहनार्ता जसा सुधा-सेक ६७
हे याची सामवती कन्या द्यावी सुखें सुमेधातें+
बुध भजति सद्गुणातें जेविं स्त्री लाधल्या क्रमें धातें ६८
ऐसी करूनि आज्ञा झाली अंतर्हिता भवानी ती
भक्त-यश करावें हे पहिलीच जिची नव्हे नवी नीती ६९
सविधि सुमेध्यासि दिली सामवती बहुसुखें निवालिहि ती
ज्ञाते म्हणति कपाळीं पहिलें मोडुनि नवें शिवा लिहिती ७०
सारस्वतासि झाला सद्गुण संपन्न पुत्र सज्जन हो[1]
या शिव भक्त-यशामृत पारावारीं सदैव मज्जन हो ७१
रामात्मजें मयूरें लिहिली हे सत्कथा यथाबुद्धी
जी सेविली कमीतरि देती श्रीजान्हवी तशी शुद्धी ७२

---

## अध्याय १०

श्रीमत्-सांब-शिवाचें तद्भक्तांचेंहि चरित सेव्य जना
हें अमृत-स्रवत्याही ताप हरूनि तुच्छ करितसे व्यजना[2] १
होता अवंतिदेशीं ब्राम्हण नामेंकरूनि मंदर तो
त्या तहेंच म्हणे हा विषयांतें प्रेम धरूनि मंद रतो २
सर्व स्वधर्म सोडुनि तो वेश्यापिंगलेसिं हो रमला

---

१ होऊ. २ पंख्याला. + नामविशेष (ऋषि) त्यातें. * ज्ञात्यातें.

कमला मंदर गणिका- गेहीं अळि[1] साऱसां[2] तसा गमला ३
अति सदय ऋषभनामा शिवयोगी सहज मंदिरा आला
झाला प्रमुदित मंदर पूजी गणिकासह स्वयें त्याला ४
परमाद्भुत योगिश्वरण सन्मणि करणार पिंगलाला हे
पूजुनि सुकृत विपुल तो द्विज मंदर[3] तीहि पिंगला लाहे ५
निज-चरण-रजें लज्जित बहु चिंतास्पर्शपूर्वमणि केला
ऋषभें राखि वसुनि शुचि विप्राला करुनि त्याहि गणिकेला ६
त्याउपरि आयु सरतां ब्राम्हण वेश्याहि पावली मरण
परिसा मंदर कैसा तरला पूजूनि साधुचे चरण ७
होता दशार्ण भूपति तो नामें वज्रबाहु तज्जाया[4]
सुमति तिच्या गर्भी ये कर्में असुखीं सुखींहि मज्जाया ८
त्या सुमतिस सवतीनीं न धरुनि कृपा दिलें विष मराया
कर्म न कळे प्रियहितें जें बहु संपादिलें विषम राया ९
ती घोरहि विष भक्षुनि महिषी मेली न दैवयोगानें
परि पावे मरणाहुनि अतिदुःसह दुःख विषज-रोगानें १०
कष्टें पुत्र प्रसवे ज्येष्ठस्त्री वज्रबाहुची काळीं
विषयोगें व्रण झाले देहीं तैसेचि त्या तिच्या बाळीं ११
रात्रिंदिवस बाळ रडे ती सुमतिहि उग्र दुःख साहेना
राहेना क्षणा पीडा वैद्यशतहि यत्न उपाय पाहेना १२
राजा म्हणे न वांचति न मरतिही रात्रिंदिवस आरडती
न निजों देती कोणा स्त्री-शिशुहुनि बहु म्हणोनि हा रडती
मज दुःख पाहवेना आरडणें क्षणहि हें न[5] साहवेना
सदनांत राहवेना उद्वेगें राज्यभर वहावेना १४
मी या प्रजावनार्थचि केवळ पादपसमान सत्य जितां
अस्वस्थ न होतां स्त्री- सुत कठिन करूनि मानस त्यजितां

---

१ भ्रमर. २ कमलां ३ चिंतामणि, आणि परिस, तो. ४ तद्-जा-या- त्याचीस्त्री. ५ बुडाया.

सू[1]ता बा होनि रथीं टाक वनीं मज सुचेचि न परा-धी
स्त्री-पुत्र-त्यागास्तव धर्मज्ञ सुरें म्हणोत अपराधी १६
भर्त्याच्या आज्ञेनें त्यजिली ती सालजा वनीं सूतें
भू तें कर्म न साहे कांपे वद्‌लीच हा असीं भूतें १७
त्या राजस्त्रीचें तें दुःख सुदारुण वदेल काय कवी
नायक विप्रांचा जो शौनक त्या कठिण सूत आयकवी १८
व्याघ्र-वृक-व्यालांला पाहुनि भ्याली पिशाच आरडली
निज-पूर्वकर्म निंदुनि मूर्छित पडली म्हणोनि हा रडली १९
झाली क्षुधा-तृषार्ता क्षत+चरणा अश्रुनीं सती न्हाली
आली कां न मृ[2]ति म्हणे माता मज पापिणीस कां व्याली २०
भ्रमतां भ्रमतां पावे पद्माकर-वैश्यराज नगरातें
तद्दासीनें कथिलें जें राजक[3]लत्र भाजन ग[4]रा तें २१
वैश्यवरें वृत्त पुसुनि तोषविली कन्यका जसी तातें
वाल्मीकि वैश्य सम परि हे पावे दुःख जें न सीता तें २२
त्या वैश्य-गृहीं नृपसुत सारुनि भो[5]गें सुता अघा मेला
भोगवितां कर्मांचें फल सदयहि विधि कधीं न घो[6]मेला २३
सुत-शोकें राज्ञीच्या झाला अत्यंत भर विलापाला
पतिस म्हणे अजि मज कां विष वल्लीच्या न भरविला पाला
पुत्रासि म्हणे त्वांही परदेशीं टाकिली कसी बा हे
आहे युक्तचि तुज हें पुत्र पित्याच्याचि रीतिनें वाहे २५
तोंचि ऋषभ शिवयोगी ताराया शोक-सागरीं आला
त्याला तो वैश्येश्वर शिव समजुनि सविधि पूजिता झाला
सुमतिसमीप प्रभु तो बैसोनि करि स्वयें तिला बोध
जेणें भ्रम नटिका या लागावा आत्मवस्तुचा शोध २७
वत्से सत्सेव्य तुज ज्ञानामृत ओपितों भ्रमीं नटिकें

१ हे सारथ्या. २ मरण. ३ राजस्त्री. ४ विषा. ५ दैव. ६ द्रवला.
+ व्रणयुक्तचरणजीचेअसी.

एकचि शाश्वत आत्मा जन्म मरण देह जाण हें लटिकें २८
अध्यात्मरूप ओखद तोखद तो खदखदां हसायाला
द्वेताझाला योगी स्वस्थ प्रळयांतही वसायाला २९
परि ती सुमति म्हणे वा सत्य वदसि सत्समागत स्वामी
रोगार्ता शोकार्ता स्त्री कीं केवळ जडा गतस्वा मी ३०
पतिनें त्यजिली रुग्णा म्हणवुनि मी नकरितांहि अत्याग
पुत्रें सोडविलें वा माझा तुज योग्य होय अत्याग ३१
द्रवला श्रीशिवयोगी भस्म लय मृतार्भकाननीं घाली
तत्काळ तत्प्रभावें गेली ती फिरुनि चेतना आली ३२
तो मृत बालक भस्में श्रीशिवमंत्राभिमंत्रितें झाला
सेवा घडली होती पूर्वी या ऋषभयोगिची ज्याला ३३
नेत्रें उघडुनि सहसा पाहे आशा बघा शिशु स्तन्य
पाहुनि विस्मित झाला वैश्येश्वर जन तसाचि जो अन्य ३४
बाळातें आलिंगुनि राज्ञी आनंदली म्हणे धन्या
अन्या मत्सम नाहीं बापा त्वां तारिली भली कन्या ३५
पुनरपि भस्म सुमतिच्या तत्पुत्राच्या तनूशि तो लावी
दिव्य तनु पळांत करी देवीसीं जी विशोक तोलावी ३६
जें दिव्य सुख शचीचें त्याहुनि सुख अधिक शतगुणें लाहे
ऋषभाचे पाय धरी मत्युपकृतितें न ती सती पाहे ३७
ऋषभ सुमतितें उठवुनि आश्वासन करुनियां म्हणे हर्षे
वत्से वांचसिल सुखें न जरा स्पर्शेलि शाश्वतें वर्षे ३८
विश्वीं विख्यात तुझा होईल भद्रायुनाम हा तनय
जे शत्रु तथांकरवीं सति याचा मोडवील हात नय ३९
हा निज-राज्यातें तव-हृदय कराया सि थंड पावेल
पावे जैसा सेकें लाहुनि बहु वृद्धि मंडपा वेल ४०

---

१ द्वयरहिता. २ रोगग्रस्ता. ३ अति-आग-अति अपराध. ४ मृत-अर्भक-आनन-मेलेल्या बाळकाच्या मुखीं. ५ उदकसिंचनें. ✱ वांचला.

सद्गुरु-कृतोपदेशीं जो होय मानविश्व हा तनय
याकिपुरीं वस वसे पद्माकर वैश्यवर न हो ननय ४१
वांचवुनि भस्मवीर्यें यापरि तो ऋषभदेव दोषांतें
ते शुनि पुसोनि त्यातें जाय करुनियां यशा अमोघातें ४२
लिहिली कथा यथामति श्रीरामसुतें नमूनि साधूंतें
कवि म्हणति सुपद जें या वर्णुनि शिव शिवजनासि साधूं तें ४३

---

## अध्याय ११

चंद्रांगद-नरपतिची पत्नी सीमंतिनी तिची कन्या
जी पिंगलाभिधाना झाली ती कीर्तिमालिनी धन्या १
भद्रायु राजनंदन वाढे वैश्येश्वराचिया गेहीं
सितपक्षीं चंद्र जसा सद्गुण-गणाही तयाचिया देहीं २
भद्रायुचा सखा जो वैश्याधिप-पुत्र सुनयनामा तो
तद्रूप-मधु म्हणे मज सेवुनि रंभादि-सुनयना मातो ३
भद्रायु सुनय दोघे वैश्यवराचे बहिश्चर प्राण
राजस्त्री धात्री बहु करि तेव्हां योग्य तत्परित्राण ४
ते रत्न-कनक-मंडन-मंडित दोघे कुमार नवसाचे
जोंजों वाढति तोंतों वैश्यपतिमनीं प्रमोद नव साचे ५
भद्रायुचें उपनयन विनवुनि विप्रांसि वैश्य तो करवी
स्वसुताचेंहि मग करी त्या पद्मा होय सुमति तो करवी ६
विनयान्वित गुरु-सेवा- सादर विद्या कळा सुखें शिकले
पिक लेखिले सकलगुण सत्कविनीं आम्रवृक्ष ते पिकले ७
शिवयोगी सोळाव्या वर्षीं ये नृप सुता पहायाला
तच्चरणीं शिर वाहे राज्ञी पुत्रासि कथि वहायाला ८

---

१ अकनय. २ दाई. ३ बाळसूर्य. ४ कोकिळ.

त्या माता-पुत्रांहीं शिवयोगी पूजिला सदाशिवसा
बहु धन्य मानिलें हो प्राणप्रद-गुरु-समागमें दिवसा ९
भद्रायुतें दयार्णव शिवयोगी ऋषभ तो पुसे बापा
कुशल असे कीं पावत नाहीं कीं माय हे तुझी तापा १०
शिकलासि कीं सुविद्या गुरुसेवा करिसि कीं सदा भावें
स्मरतोसि कीं मला स्व-प्राण-सखा गुरुसि ऐकिल्या नावें ११
ऐसें वदतां गुरुच्या पायांवरि घालुनि स्वतनयातें
सुमति म्हणे गुरुवर्या त्वदधिक नाहींच आप्तजन यातें १२
हा तव वत्स स्वामी प्राणप्रद तूं पिता खरा याचा
या शिष्यातें बोधीं उपदेश तुझाचि हित करायाचा १३
त्यजिला स्वबंधुनीं हा झाला केवळ अनाथ बाळा या
पाळाया तूंचि क्षम याचें दुरदृष्ट दुःख टाळाया १४
यापरि नमुनि सुमतिनें निज-पुत्र-हितार्थ विनविला[1] योगी
सांगे सन्मार्ग तया सुजना या श्रुतिपथासि ती यो[2]गीं १५
वत्सा शाश्वत होय श्रुति-तंत्र-पुराण-कथित जो धर्म
तो सेव्य उभयलोकीं प्राणी तेणेंचि पावतो शर्म[3] १६
भज सन्मार्गातें तूं देवज्ञाची[4] करूं नको गर्हा[5]
स्वप्नींहि देवहेलन नकरावें हे रिती तुला अर्हा[+] १७
गो-देव-गुरु-ब्राम्हण यांची तूं भक्ति सर्वकाळ धरीं
चांडाळाहि अतिथिचें पूजन मानुनि मनांत शंभु करीं १८
त्वां सत्य न त्यजावें मानावें प्राण-संकटहि फोल
गो-ब्रम्हण रक्षाया वत्सा केव्हां असत्यही बोल १९
देव-द्विज-पर-वनिता परधन तैसेंचि वस्तु दुर्लभ जें
याची तृष्णा नधरीं पुण्ययशस्कर असेल तेंचि भजें २०
जी सत्कथा स[6]दागम सद्व्रत सद्धर्म जें सदाचरण

---

१ ठेवी. २ वाणि. ३ सुख. ४ ज्योतिषाची. ५ निंदा. ६ सत्-आगम सच्छास्त्र. + योग्या.

बा याची तृष्णा धर भावें स्मर शंभुचे सदा चरण २१
गो-विप्रातिथि-पूजन स्वाध्याय स्नान होम मंत्र जप
पितृतर्पण देवार्चन यांतें तूं आळस त्यजूनि जप २२
बा कोप लोभ शठता असदाग्रह पिशुनता कुटिलभाव
उद्वेग दंभ यांतें सोडीं जोडीं महाजनीं ठाव २३
तूं क्षत्रधर्मरत जरि तरि बा हिंसा करूंनको स्वैर
बहुभाषण परनिंदा वत्सा नेसेंचि शुष्क जें वैर २४
हें न तुवां विसरावें स्त्री-मृगया-द्यूत-पान यांत सदा
अत्यासक्ति नसावी स्त्रीजित अविनीत जे नशांत कदा २५
सुखसंपन्नीं मैत्री नित्य दया दुःखितीं जनींहि करीं
संतोष पुण्यवंतीं बा औदासीन्य दुर्मतीं न धरीं २६
अतिपूर्व अतिक्रोध श्रम निद्रा-हार-भाषण-क्रीडा
हे षट्पदार्थ वर्जीं होयिल यांतें नवर्जितां पीडा २७
विद्योत्साह श्रद्धा स्मृति पुण्य ख्याति धैर्य हें आधीं
अनघा मन घालुनियां अतिपूर्वक षट्पदार्थ तूं साधीं २८
सक्रोध हो अरिजनीं स्वकलत्रीं हो सकाम तूं बापा
सुद्रूप सलोभहि चित्तीं हो स्वजनाच्या हरावया तापा २९
हो द्वेषी पाखंडीं साधुजनीं हो सराग तूं बा गा
दुर्मंत्रीं केवल-जड-पिशुनोक्तीं बधिर हो महाभागा ३०
नास्तिक धूर्त पतित शठ षंढ कितव चपल खल जड क्रूर
निज-कल्याणाकरितां वत्सा सोडूनि यांसि दे दूर ३१
नकरीं निज-प्रशंसा विज्ञानेंगितपरा नको होवूं
पुत्रीं धनीं कुटुंबीं बा केवळ चित्त तूं नको गोवूं ३२
जननी जनक सती स्त्री गुरु सज्जन यांचिया वचा साधो
विश्वास पराहि धरीं न अविश्वासें व्यथा तुला बाधो ३३

---

१ जपतजा. २ कोणेक अर्थविषयक साधारणज्ञान आणि अभिप्रायतत्परा.

सावध सदा असावें संसारीं स्वहित कृत्य लक्षावें
पुरुषार्थाचें साधन या धनसें हें शरीर रक्षावें ३४
वत्सा भृत्याचाही तूं निजहृदयीं धरीं न विश्वास
समज मनीं गुरु-कथित- न्यायें वश मी करीन विश्वास ३५
निर्दोषि जे तयांची चित्तांत कधीं धरूं नको शंका
प्राणहि वेंचुनि रक्षीं वृद्धा बाळा सुदुर्बळा रंका ३६
वधयोग्यहि अरि येतां शरण तयातें वधूं नको जाण
शरणागत जो त्याचे या रक्षावेचि सर्वथा प्राण ३७
या पात्र अपात्र असो नीच महत्तम कसाहि हो पावें
जो याचना करील स्वशिरहि हर्षें तयासि ओपावें ३८
यत्नें कीर्तिचि जोडीं या होय पदार्थ हाचि बहु धन्य
राजे पंडित यांचें भूषण नाहींच कीर्तिहुनि अन्य ३९
सत्कीर्ति-प्रभवा श्री पुण्यहि सत्कीर्तिनेंचि या तोक[2]
ज्योत्स्नेनें चंद्र जसा शोभे सत्कीर्तिनेंचि हा लोक[1] ४०
धन मेळविलें जें हय गज कांचन रत्नराशि सत्वरतें
त्या या अकीर्ति होतां सोडावें तृण तसेंचि सत्वर तें ४१
ताताच्या मातेच्या गुरूच्या नित्य क्षमा करीं रागा
आगा[3] निजपुत्राच्या भूदेव-सुताऽनयाहि तूं या गा ४२
जेणें प्रसन्न होइल विप्र तसें तूं करीं हित तयांचें
हे बुडतां उद्धरिती या गातीं यश जगीं वितत[4] यांचें ४३
आयुष्य कीर्ति यश बल पुण्य-द्रव्य प्रजोन्नति प्राज्य
जेणें तें कर्म करीं धर्मन्यायेंचि चालतें राज्य ४४
अत्वर निद्रे सत्वर अशनीं हो शिवयशोमृतें या धा[5]
कोणालाहि न पीडीं शीघ्र पराची स्वयें हरीं बाधा ४५
बह्वर्थ जन-मनोहर स्वल्पाक्षर मधुर सत्य बोलावें

१ जगास. २ बालक. ३ अपराधा. ४ विस्तार पावलेलें. ५ वृषहो.

ज्या सद्वाक्य-श्रवणें बुध-श्रोत्यांचेंचि शिरहि डोलावें ४६
संपत्तींत विपत्तिंत वत्सा होवूंनको कधीं [१]भ्रांत
पापीं गुरु-बहुबोलीं ब्रम्हकुळीं सर्वकाल हो भीत ४७
ज्ञाति-सुत-बंधु-मित्रीं भार्याजन-पंक्ति यांत समभावें
वर्तावें नित्य तुवां कीं सर्वहीं तुझेंचि यश गावें ४८
संतांचे अति-हितकर उपदेश तशाचि पुण्य-धर्म-कथा
यालें विमुख नहो तूं वत्सा सोडूंनकोचि भव्यपथा ४९
ब्राम्हण-[*]संकुल शिवमय जो तीर्थ क्षेत्र पुण्यदेश वरा
त्यांत वसावें कीं यम- सुस्थानीचा न भीतिदेश वरा ५०
कुलटा गणिका कामुक जेथें बहु नीचजन तशा स्थानीं
राहूंनको क्षणहि कीं दुर्देशीं न प्रवर्तती ज्ञानी ५१
एक-त्रिभुवन-पति-शिव- चरणाश्रित तूं तथापि सुर समज
शंभु विभूति भजतया जाण ऋषभ देतसे स्व-सु-रस मज ५२
तो तूं सदा स्थिर सदा- दक्ष विजित शांत विजित षड्वर्ग
भर्ग-ध्यान-रत सदा अपवर्ग मिळेल मग किति स्वर्ग ५३
यति विप्र पुण्यतरु वृष धेनु म[††]हत्सर नदी सतीरत्न
निज-कुल-दैवत गुरुजन यांच्या नमनीं करीं सदा यत्न ५४
आचमन करुनि शुद्ध ब्राम्हमुहूर्तीं उठोनियां व्हावें
भावें गुरु-चरणातें नमुनि शिवातें सदा तुवां ध्यावें ५५
विष्णु चतुर्मुख लक्ष्मी स्कंद विनायक उमा सती वाणी
शक्रादि लोकपति ऋषि- वर मेरुप्रमुख नग मनीं आणी ५६
त्यां उदयातें येतां श्रीरविचे किरण-चरण वंदावे
दारिद्र्य दुःख दुरित- ध्वंसें प्रारब्ध-भोग मंदावे ५७
वा गंध पुष्प फल कीं तांबूल प्रिय पदार्थ नव सर्व
शर्व-निवेदित सेवीं बहुमानीं सकल शंभुचें पर्व ५८

१ पर्यंत. २ महादेवाला निवेदन केलेले. * ब्राम्हणानीं व्यास. + स्वीकारा. †† मोठे सरोवरे. ‡ शिवध्यान.

स्नान जप ध्यान तप स्मृतिहोम असें घडेल जें कर्म
सर्व शिवासि निवेदीं किंबहुना स्वापजन्यही र्शर्म[1] ५९
पर्यटण-भुक्ति-भाषण-शयन-क्रीडेंत सर्वदा साचा
प्रेमा शिवीं असावा हाचि महाधर्म सर्व दासाचा ६०
रुद्राक्ष-भस्म-धारण शिव-नाम-स्मरण साधुसंग हवा
हे भूषविते म्हणती कवि मणिमय-हार-मुकुट-अंबर वा ६१
ऐसा तुज संक्षेपें धर्मांचा संग्रह स्वयें युक्त
कथिला अन्यपुराणा- मध्यें जो विस्तरें असे उक्त ६२

---

## अध्याय १२

कथितों शिवकवच तुला वा जेणें सर्व ताप हरपावे
ज्यातें देहीं धरितां विश्वाचा मायबाप हर पावे १
भद्रायुला शिवकवच उपदेशुनि ऋषभ मुनि म्हणे वाहें
वाहें नित्य शरीरीं शिववर्मे भद्र सर्वदा पाहें २
ऐसें सांगुनि भगवान् दिव्य महानाद शंख दे हातें
तैसाचि खड्ग ज्याचें दर्शन करि भस्म शत्रु-देहातें ३
अभिमंत्रुनि भस्म पुन्हा लावी भद्रायुच्या शरीरास
द्वादशसहस्त्र-कुंजर- शक्ति तयामाजि तो करी रास ४
भस्में पावे तो बल ऐश्वर्य धृति स्मृति क्षणीं शोभे
तेजें शरदर्क[3] तसा त्या पाहुनि दृष्टि सुमतिची लोभे ५
अंजलि भद्रायु करी त्यासि म्हणे ऋषभ पुत्रका परिस
तूं जिंकिसील समरीं मृत्युसमाही महाबळा अरिस ६
मंत्रजपें सिद्धि महा- तेजस्वी खड्गराज हा हातीं
देखतिल रिपुबळें जीं भस्मचि होतिल म्हणोनि हा हातीं ७

---

१ निद्रेपासून झालेलें. २ सुख. ३ शरत्- अर्क- शरदृतूंतील सूर्य.

या बाणाच्या ध्वनितें जे श्रवण[1] तुझे अराति करितील
ते त्यजुनि आयुधातें मूर्छित पडतिल न धैर्य धरितील ८
हे दिव्य-खड्ग हर-वर करितिल पर-सैन्य-घात तत्काळ
स्वबळ स्वसहायाचें वाढवितिल शौर्यतेज तत्काळ ९
याच्या तेजें शौर्ये कवचें द्वादश-सहस्र-हस्ति-बळें
भस्माच्या सामर्थ्ये अहितांचें सैन्य जिंकिसील पळें १०
षड्वर्गातेंहि भयद होसिल पक्षींद्र तो जसा अहितें
स्वपित्याचें सिंहासन पावुनि तूं पाळिसील या महितें ११
करुनि प्रसाद यापरि सिकवी भद्रायुतें ससुमतीतें
तत्पूजित ऋषभ निघे करि भुवनें यश पिवूनि घुमतीतें १२
लिहिलें सुयश मयूरें या हेतु सदाशिवाख्य गोसावीं
कीं सद्रसिकहरिजनें स्वपर यशें बहु जगांत पोसावीं १३

---

## अध्याय १३

भद्रायुचा पिता जो नरनायक वज्रबाहु यानावें
याचें भाग्य सुकविनीं शक्राचें जेविं तेविं वानावें १
त्याचा शत्रु मगधपति हेमरथ प्रबळ बहु-चमू-सहित
वेढुनि लुटिता झाला सुसमृद्ध दशार्णदेश तो महित २
नगरीतें मग वेढी तो मागध हेमरथ असें पाहे
साहे न वज्रबाहू नृप सबळ निघे सुधनु करीं वाहे ३
बहु मागध-दल मर्दी आठउनि मनीं स्वदेश लुटिला तें
वधिताचि धर्मयुद्धीं तेजस्वी वज्रबाहु कुटिलातें ४
परि वेढिला परांच्या समरीं तो वज्रबाहु सेनाहीं
त्या रविसमा कशा या बांधिति बहु शत्रु राहुसे नाहीं ५

---

१ शत्रु. २ प्रति[?]ध्वनियुक्त होती.

किति कांहीं बल मथिलें कोणी हय सूत मारिला चाप
कोणी खंडी कोणी खड्ग-छेदी न आठवी पाप ६
बहुतांहीं विरथ करुनि धरुनि हरुनि तेज बांधिला दैन्य
बहु वज्रबाहु पावे हेमरथाचें जयें फुगे सैन्य ७
जयमत्तें हेमरथें अमात्य हतशेष सैन्यही कुटिलें
पुर अंतःपुरहि तसें धर्म न कांहींच रक्षिला कुटिलें ८
चालविला भूप रथीं घालुनि सर्वस्व हरुनि देशाला
जन विधिच्या वाताच्या केसा लंघील तरु निदेशाला ९
हें ऐकुनि भद्रायु क्षिप्र हयावरि चढे कढे क्रोधें
सुनय+सह निघे असिदर- कर जो परिपूर्ण गुरुकृतें बोधें १०
भद्रायु बहु क्षोभे निःश्रीक दशार्णदेवा पाहूनी
मागध-कटकांत शिरे मारितचि सुटे परांसि बाहूनीं ११
शिववर्म रक्षितां त्या परशास्त्रांची न ताप दे वृष्टी
जेथें सवैराग्यानें स्त्रीरत्नाची रसच्युता दृष्टी १२
एक नृप वधुनि समरीं भद्रायु तयाचिया रथीं चढला
सुनय तयाचा सारथि झाला विद्या जपोनि जो पढला १३
जैसा सिंह मृगकुलीं शत्रुकुलीं तो तसें करी दर्पणें
ते त्यापुढें टिकावे झडुनि सभाग्यापुढें कसें भणगें १४
पुनरपि हेमरथाचा खवळुनि बळ-पति-समूह करि लगट
वाटे सिंधुचि तो त्या राजसुतातें रणांत करिल गट १५
तेव्हां कार्मुक ठेवुनि कोशांतुनि दिव्य खड्ग आकर्षी
त्या पाहुनि अरि मेले तें देखुनि हृष्ट होय नाकर्षी १६
जें तेज रुद्र-नयनीं तेंचि धरी तो करांत करवाल
जाणों हांसोनि म्हणे काय मजपुढें कराल करवाल १७
जे जे शत्रु पहाती रणांगीं झळकल्या तया असितें

१ झांकड्यानें. (हेमरथें या शब्दाचें विशेषण.) २ आज्ञेला. ३ शृंगारादिरसा नीं युक्त. ४ म्यानांतून. ५ भयंकर. ६ तलवार. + नामविशेष (सारथी) त्यासह ✻ खड्ग आणि शंख हातांत घेणारा असा. ≠ हाणाहाण.

ते [illegible] सर्वांचीं आहवीं सुखें [illegible] १८
[illegible] मानुनि सहसा प्रज्वळित-वह्निंतें मरती
परवीर [illegible] रणीं कोणी न तया महासितें तरती १९
[illegible] नाशाया दिव्य शंख वाजविला
मूर्छित करुनि सकळ रिपु तेणें कल्पांतमेघ लाजविला २०
अश्व-गज-रथारूढ प्रबळासि समय दरवें खचले
गरुडापुढें फणीचें शत्रूचें बळ तयापुढें नचले २१
न वधी मृत मानुनि अरि-सैन्या मूढा निरायुधा त्यातें
पाहुनि सत्य विनविती मुनि हा व्हाया चिरायु धात्यातें २२
तातातें मुक्त करी पौर-सचिव-दार-सहित मातांतें
ससचिव-हेमरथातें धरि यश निववी कवींस गातां तें २३
सर्वस्व स्वपित्याचें हेमरथाचेंहि रत्नमात्र हरी
स्वयश श्रवण करित तो निज-जनक-पुरीं सुखें प्रवेश करी २४
सचिव-चमूपति पुरजन गेलेहोते पळोनि जे भग्न
येउनि कुमार-विक्रम पाहुनि झाले महासुखीं मग्न २५
वज्रभुजादिक म्हणती हा देव स्पष्ट पावला गावा
आम्हीं मृत वांचविले याच्या चरणींच भाव लागावा २६
हा होय सिद्ध कोणी किंवा करुणासमुद्र हा अमर
याचें कर्म अमानुष अत्यद्भुतरूप होय हा समर २७
बहुधा याची माता गौरी श्रीशंभु तात हा स्वामी
याच्या मग्या झाल्या दश कीं अक्षौहिणी महाधामीं २८
करुनि असें ऋषभवरें आत्मजनाच्या धिपतिचें शमन
तो भद्रायु मग करी त्या स्वपित्या वज्रबाहुतें नमन २९
पुत्र असें नेणे परि आलिंगुनि सुहृद महिवरें शतदा
होउनि उपकारार्णव-मग्न पुसे त्यासि महिवरेश तदा ३०

१ काळीं.

[illegible]
हरिव [illegible]
[illegible] धर्मी [illegible] देवा [illegible]
उपकारातें असेल जन्म-बहूतें करूनि फेडावा ३४
माता तात स्वकुल स्थान सखा सांग हें तुझें वज्र
त्यां अमृत ग्रथीं किंवा विजूनीं हृदयांत लिंपिलें आज्य ३५
ध्यावें हरिचें तेसें भव्य तुझें नाम काय या जांग
द्विषदर्णवांत आम्हां कोणाकाही नकाणसा वांग ३६
त्यासि कुमार म्हणे हा वैश्याऽधिप-पुत्र सुनय याजावें
माझा परम सखा या स्वप्राणाहूनि अधिक मानावें ३७
या सुनयाच्या सदनीं मातेसह बहुतकाळ मी वसतों
प्रेमरसचि अधिक असे न असा बहुमत बुधा सुधारस तों
भद्रायु नाम माझें वरकड मवृत्त मी पुढें कथिन
निर्भय वस निजनगरीं जरि अरि उठतिल पुन्हां नवा मथिन
यां शत्रूतें माझें येणें जों होय तों न सोडावें
मोडावें न मन करूनि पोषण सयश सुपुण्य जोडावें ३८
राया प्रेम असोंदे जातों मातेकडेचि तन्मना
व्हावें गुरुदर्शन मज सुक्षुधिताच्या जसेंचि अन्न मना ३९
ऐसें वदुनि पित्यातें पुसुनि सुनयसह निघोनि जाय कवी
भद्रायु वैश्यनगरीं मातेतें नमुनि सर्व आयकवी ४०
आलिंगी पुत्रातें सुचिर सुमति साऽसुलोचना माता
तो वैश्यपतिहि भेटे पूजी भद्रायुच्या क्रमीं माता ४१
स्त्री-पुत्राऽमात्य-सहित वज्रभुज स्वालयीं सुखें राहे
पाहे प्रत्युपकार न भद्रायु-स्मरण घडिघडी वाहे ४२
त्याकाळीं शिवयोगी भेटे चंद्रांगदासि तो याची

---

१ विजुला. २ द्विषद्-अर्णव-शत्रुसमुद्रांत. + वज्रबाहु

प्रेमें करि बहुपूजा जेविं तृषित पांथ तीर्थ- तोयाची ४३
एकांतीं जन्मकथा सांगे भद्रायुची तया धन्या
कर्म अमानुष वर्णी घडलें नाहींच जें कधीं अन्या ४४
ऋषभ म्हणे समुचित हा वर दे या कीर्तिमालिनी दुहिता
सुहिता कीर्ति मिळविता पावे तैसा न सुरभिचा दुहिता ४५
चंद्रांगद मान्य करी दिधली सीमंतिनी म्हणे तनया
मन वा आज्ञा- श्रुतिला स्वामी लंघुनि करील कां अनया ४६
जो सत्पात्रीं कन्या- रत्नाऽर्पण- भव्यबोध तो घांस
पीयूषाचा भरवुनि जाय ऋषभमुनि पुसोनि दोघांस ४७
प्रेषुनि सचिव पुरोहित आणुनि नगरीं महोत्सवें धन्या
भद्रायुला दिली ती निषधेंद्रें कीर्तिमालिनी कन्या ४८
मग वज्रबाहु नेला नळपौत्रें सचिवयुक्त बाहूनी
जावुनि पुढें उरासीं धरिला आजानु- दीर्घ- बाहूनीं ४९
चंद्रांगद- नृप- सदनीं वज्रभुज करी प्रवेश तों पाहे
सिंहासनीं समोरचि भद्रायु सदार बैसला आहे ५०
तातातें अवलोकुनि भद्रायु सदार ये धरी पाय
उठवी वज्रभुज म्हणे बा त्वत्साधुत्व मी वदों काय ५१
ऐसें वदत प्रेमें भेटे भद्रायुला न कळल्याला
रोमांच- कंचुकातें परि वपु झांकूनि तो सकळ त्याला ५२
नळपौत्रासि म्हणे हा सेतु विपत्सागरांत ताराया
या वीरशिरोमणिनें मज दिधलें प्राणदान बा राया ५३
याच्या प्रसूसि गातिल त्या ज्याल्या वीर अन्य ज्या माता
चंद्रांगदा तुझा हा जनकाचा तेविं धन्य जामाता ५४
कोणा वंशींचा हा सांगावा मज तुवां कुमारमणी
झाली वरदा याच्या मातेला शंभुची उमा रमणी ५५

---

१ कन्या. २ दोहनकर्ता. ३ बोलावून. + मातेस.

चंद्रांगद एकांतीं वज्रभुजानें म्हणे परिस राया
कथितों सत्य तुज तुझ्या नसरावा भ्रम कधीं परि सशया ५६
टाकविली रोगार्ता सरुता जी त्वां महावनीं भार्या
ती पद्माकर-वैश्यें स्वसुतासी पाळिली गृहीं आर्या ५७
तेथें दारुण-रोग- ग्रस्त स्वसुत्र पावला मरण
तेव्हां पूर्वभयार्चित शिवयोगी ऋषभ दाखवी चरण ५८
तेणें मृत वांचविला प्रेमें भद्रायु ठेविलें नाम
सुमति तुझी महिषी ही केली आरोग्य- सद्गुणा धाम[1] ५९
द्वादशसहस्र गजबळ अहितांच्या खड्ग-दर दिले ज्ञमना
भद्रायुच्या न व्हावा श्रम अमर-पराभवींहि लेश मना ६०
मथिल शिवकवच-रक्षित तवसुत भद्रायु अहित-कोटींतें
जें गिरिशीं ऋषभाऽर्पित भस्माच्या दिव्य तेज पोटीं तें ६१
हा झाला प्राप्त मला बहुभाग्यें पुण्यकीर्ति जामाता
त्यावा भद्रायु गृहीं त्वां याची सुमति सुबला माता ६२
ऐसें सांगुनि राजा नैषध अंतर्गृहांत जी होती
सुमति शचीसी भव्या आणवुनि तयासि दाखवी तो ती ६३
तेव्हां निजकर्मातें निंदी बहु वज्रबाहु तो लाजे
स्वमनीं म्हणे खरे ते अविवेका म्हणाति शहु तोला जे ६४
आलिंगी पुत्रातें भूप भुजग जेविं चंदनाऽगातें
कवि-शत ताप-हरखें तेसेंचि गुणाढ्य- नंदना गातें ६५
हर्षे दशार्णपति बहु वर्षे प्रेमाश्रु रसिक सत्कृतिनें
तेविं दृढ धरी हृदयीं महिषीतें करि यथार्थ-सत्कृतिनें ६६
चंद्रांगद सचिवांसह सत्कारी वज्रबाहु- भूपातें
तत्परिवारातेंही पूर्ण करी मेघ जेविं कूपातें ६७
बहुनिवुनि म्हणाति लोकीं न मिळाला मंदिरी असा व्याही

---

1 स्थान.

वाटे सुविरक्तजनां संपत्ति अशा सदा असाव्याही ६८
पाहुनि आदर नव नव बहुदिन सत्संगलाभ राहुनि घे
सालज सदार सस्नुष पुसकनि निषधपतिस वज्रबाहु निघे
आला स्वपुरास नृपति उत्सव निःसीम तत्पुरीं झाला
ज्याला हें सुचरित जो अमृतें हि न शक्रही तसा धाला ७०
वज्रभुज स्वर्गातें गेल्यावरि धर्मसत्वयें राज्य
भद्रायु नृपाल करी संपादी गुरुवरें यश प्राज्य ७१
शिवभक्ताची पूजा करुनि असा धन्य जाहला लोकीं
नोकीं तात तसा शिव दावी हें चरित सज्जना घोकीं ७२
अद्भुत कथा यथामति लिहिली ही रामनंदनें भावें
शिवभक्त म्हणोत शिवा करुणाब्धे या स्वसेवका पावें ७३

---

## अध्याय १९

भद्रायु नृप वसंतीं रम्यवनीं कीर्तिमालिनी-सहित
क्रीडाया गेला जों कुबभवरें भूपमंडळीं मुदित १
तेथें दूर व्याघ्रें कांपविलें विप्रदंपती पाहे
ते आरडती म्हणती रक्ष नृपा वनचि हें तुझें आहे २
ऐसें विप्र प्रार्थी तों व्याघ्र ब्राम्हणीस झडपून
धरिता झाला सहसा तत्कंठ स्वाननांत दडपून ३
हो नाथ हो महेश्वर हो शंकर हो उमेश हो कांत
ऐसा व्याघ्रें धरितां विप्रस्त्री करि उदंड आकांत ४
भद्रायु अभय देवुनि शार्दूलीं विशिख-वृष्टिनें सोडी
बहुतांतुनि एकहि शर न तयाचें एक लोमही तोडी ५

---

१ बालकीं. २ हाय.

अश्रुभ व्याघ्र हरी   नाशुनियां जोडिलें यश[1] ज्यानें
झटला परि रक्षाया   क्षमला भद्रायु तो न शत्रूंनीं तें   ६
शार्दूलें स्त्री नेतां   विप्र क्षोभे म्हणे कशाला हो
धनु धरिलें जें नम्हणे   शरणागत-रक्षणें यश लाहो   ७
तव दिव्य खड्ग शंख   व्यर्थ द्वादशसहस्र-गज-वाजी.
शिवकवचमंत्रविद्या   शंख्याऽस्त्रें निष्फलाचि शिवभक्ती   ८
कैसा रे क्षत्रिय तूं   तुज न वनांतील वारवे जंतू
धर्मभ्रंश नघडतां   मृत्यु बरा हा नव्हे वश मंतू[2]   ९
करिसील काय देहा   पोषुनि बुहु मांस-मेद-मज्जा या
मज्जायावन[3] न करुनि   वांचसि कां अपयशांत मज्जाया[4]   १०
आर्त-त्राण-विहीना   मरण बरें जीविताहुनि स्पष्ट
इत्यादि बहु वदे द्विज   पावे भद्रायु ऐकतां कष्ट   ११
स्वमनांत म्हणे झाला   मत्सोरुष-कीर्ति-नाश कीं सहसा
शोकचि भासेल पुढें   होतों लोकांत मूर्तिमन्महसा[5]   १२
होतां दैव-विपर्यय   समयोचित धर्म जाहला नष्ट
कष्ट ज्ञाता भंगें   पावे जो तो न पन्नगें दष्ट   १३
पुण्य कराया झटतां   उत्कट पातक बळें गळां पडलें
संपद्राज्यायुःक्षय   होणार तरीच हें असें घडलें   १४
आयुष्य भाग्य भोग   स्त्रीपुत्र द्रव्य हे पदार्थ जसे
दैवें पावति उदया   विलयाही पावती क्षणांत तसे   १५
यास्तव अंतीं संतीं   गाया साधावयासि शुभ लोक
या विप्रातें प्रियहि   प्राण समर्पुनि करीन गतशोक   १६
ऐसा निश्चय करुनि   ब्राम्हण-चरणावरि क्षितीश पडे
प्रार्थी बहुदीनपणें   तनु-मानस देखुनि प्रसाद घडे   १७

---

१ यश. २ अपराध. ३ मत्-जाया-अवन- माझ्यास्त्रीचेंरक्षण. ४ बुडाया. ५ मूर्तिमत्-मह- मूर्तिमान्तेजसा.

विप्रवरा आग्न-हुत- स्त्रीचा आतां शिरोंनको शोका
या हासीं सक्रुध हो अक्रमथींही पिता जसा तोकीं १८
हेतों इष्टार्थ तुझा चित्तीं हें वाक्य सत्य आणावें
राज्य कलत्र कलेवर माझें स्वद्‌धीन सर्व जाणावें १९
ब्राम्हण म्हणे भिकारी जो त्याला कार्य या गृहीं काय
मुदास काय पुस्तक तैसा निरथींक जो म्हणे हाय २०
त्यास धनें काय नृपा माग म्हणसि तरि अभुक्तभोगा या
हतदारा विप्रास स्वस्त्री दे स्वस्त्रकीर्ति हो गाया २१
भद्रायु म्हणे बा हा धर्म तुझा काय उचित मागावें
यश जोडावें त्वां म्या ज्य कविनीं नित्य शुचितमा गावें २२
हेतों मणिकनकातें राज्यपदातें कचित स्वदेहातें
परदार-स्पर्श-दुरित ऐसें कोणी नघे नरें हातें २३
दे स्त्री समर्थ आहें ब्रम्हवधादिखिल पाप वाराया
सुतपा मी ठावें मज गाधिसुता त्याहि आपवाराया २४
उडवीन महा पापहि सुतपें मी सर्वतापसा मान्य
मग किति हें परदार- स्वीकारोत्पन्न पाप सामान्य २५
यास्तव दे निजभार्या धर्माऽधर्मज्ञ कुळज तूं नर कीं
नाहींतरि बुडसीलचि भीताचें त्राण नकरितां नरकीं २६
[1]त्याला द्विजवचनें नृप कीं सत्य-[2]अरक्षणें महादोष
चित्तांत म्हणे पत्नी- दानवरें ब्राम्हणासि हो तोष २७
पत्नीतें पावोनि ब्राम्हण हा फार हर्ष पावेल
आपणा जळोनि जावें ज्वलनीं लोकांत कीर्ति राहेल २८
भद्रायु महीपति तो हृढतर निश्चय असा मनीं आणी
ज्वलन प्रज्वलित करी पाणी सोडुनि दे द्विजा राणी २९
स्नान करुनि शुचि होउनि वंदुनि विबुधेश्वरासि तो भावें

---

१ वसिष्ठा. २ रक्षण.

पावक उजळा जाळी कीं आपण पाव सुगतिला व्हावें ३०
ऋषभातें स्मरुनि नमुनि सांबशिवध्यान धरुनि जो इंदु
पावक केला होता त्यांत शिरायासि जाहला सिद्ध ३१
तों प्रकटे भगवान् शिव भक्ता भद्रायुतें करी मुदित
जेविं चकोरखगातें पूर्ण शरत्काल-चंद्रमा उदित ३२
शक्रादि लोकपाळक बहु आले नारदादि नाकर्षी
चुंबक लोहासि तसा स्वजनासि शिवप्रसाद आकर्षी ३३
सुर वर्षति पुष्पांतें गाती गंधर्व अप्सरा नटती
भद्रायु स्तुति करिजी प्रभुनें सप्रेम ऐकिली चट ती ३४
करितां स्तवन प्रकट प्रभुच्या हृदयांबुजांत होय दया
ऐसें प्रसन्न होउनि बोले सेवक-मयूर-तोयद या ३५
शमा भजनें स्तवनें झालों परितुष्ट मी महेश मनीं
भक्त- भवाच्या सालस मच्चरण कधींहि था न हो शमनीं ३६
भाव-परीक्षे करितां केला छळ परि कसीं उतरलास
मी भक्तास स्वपदीं करितों सुस्थिर सदा सुनरलास ३७
ब्राम्हण तो मीच नृपा हे गोरी ब्राम्हणी खरें जाणा
मायामय शार्दूल व्यर्थ तुझे म्हणुनि जाहले बाण ३८
मागीतली तव स्त्री राया म्या धीरता पहायाला
चिर कीर्तिमालिनीची कीर्ति तुझी त्रिभुवनीं रहायाला ३९
भक्ति तुम्हां दोघांची भव्या झालों प्रसन्न वर माग
परमाग प्रणताचा मी प्रभु पूर्वीच करिन चरमाग ४०
भद्रायु म्हणे दर्शन दिधलें केला प्रसाद हाच वर
शक्राचेंहि ममथशें पावुनि परिभव म्हणेल हा चवर ४१
मी हे राज्ञी साध्वी मम माता तात वैश्य पद्माकर
तत्सुत सुनय यातें देवा निज-पार्श्वभाग-सद्म कर ४२

---

१ प्रदीप्त. २ परम-अग- श्रेष्ठकल्पवृक्ष.

त्या कीर्तिशालिनीतें प्रभु मान म्हणे मनांत जें इष्ट
जनकातें जननीतें मागे सान्निध्य हर्षवी शिष्ट ४३
राजातें राज्ञीतें वरद प्रेमें अधीन होय मग [1]
गुणहि कीर्ति करी कीं गातां श्रोता कधीं न हो यमग ४४
भद्रायु अयुतवर्षें राज्य करुनि दे पद स्वतनयातें
शिवसन्निधान पावे गाती व्यासादि साधुजन यातें ४५
चंद्रांगद तज्जाया देवी सीमंतिनीहि तनुजातें
देवुनि पद शिवलोकीं पावति पावोनि धन्यतनु ज्यातें ४६
लिहिली कथा यथामति भक्तमयूरें जपोनि आर्यांहीं [2]
गावी श्रवण करावी पावाया भुक्ति मुक्ति आर्यांहीं [3] ४७

---

## अध्याय १५

ऋषभ-प्रभाव कथिला शिवयोगी वामदेव यानावें
त्याचें भस्माचेंही माहात्म्य अपार किमपि वानावें १
आत्माराम स्कनिस्पृह समदर्शन मुनि दयाकुल-स्वांत
भस्मोद्धूलित-विग्रह वल्कलधर जटिल भैक्षभुक् शांत २
साक्षात् शिवसा होता शिवयोगी वामदेव शिवशील
यत्कीर्ति म्हणे चंद्रा तशा लोकां किती निववशील ३
क्रौंचारण्यांत तया- प्रति पाहे ब्रम्हराक्षस क्रूर
धांवे भक्षाया परि नचळे योगींद्र तो महाशूर ४
भुजदंडांहीं रगडुनि शिवयोगी ब्रम्हराक्षसें धरिला
अंगस्पर्शें त्याचा तत्काळचि दोष सर्वही हरिला ५
त्या ब्रम्हराक्षसाच्या नाशी योगींद्र पाप-मोहातें
चिंतामणि भव्य करी, स्पर्शुनि तत्काळ जेविं लोहातें ६

---

१ यमाजवळजाणारा. २ आर्याछंदाहीं ३ श्रेष्ठांहीं.

जंबूतटिनीसंगें जेविं कनक होय मृत्तिका [1]काची
मानस-वासें होती हंसाची तेविं वृत्ति काकाची ७
कीं अमृताच्या पानें नर होतो देव हें तसें झालें
शिव-भक्तांग-स्पर्शें शांतल ब्रम्हराक्षसा आलें ८
सुचिर क्षुधित तृषित जो तो झाला परम तृप्त [+]शिवल्याला
पूर्णानंदत्व तशा मग कां नशिरे पदासि [‡]शिवल्याला ९
शिवयोगि-देह-चर्चित-भस्म-कण प्राप्त पूत तो स्मरण
बहुजन्माचें पावे विज्ञप्ति वरी करी धरी चरण १०
बा करुणामृत-सिंधो शरणागत दीन जाण तार मला
प्रपातोद्धारींच सदा ध्याया यश [॥]पीनि जाणता रमला ११
शिवयोगी त्यासि पुसे बा तूं होतासि कोण कां गाथा
दुर्गतिस पावलास न संकोच करीं स्ववृत्त सांगाया १२
राक्षस सांगे पूर्वीं पंचविसाव्या [2]भवीं कुमति कामी
क्रोधी लोभी दुर्जय यानामें यवनराष्ट्रपति बा मी १३
वर्तत होतों निर्दय निर्लज्ज स्वप्रजघ्न मी स्वैर
करिता झालों देव- ब्राम्हण-सर्वस्वहर सदा वैर [3] १४
हरिल्या निजराष्ट्रींच्या परराष्ट्रींच्याहि बहुबळें योषा
होते स्वदार बहु परि तत्संगें पावलों न मी तोषा १५
त्रिशत ब्राम्हण-भार्या क्षत्रिय-दारा चतुःशत स्वामी
षट्शत वैश्यवधूही हरिल्या न त्रासलों परस्वा मी १६
शूद्रांगना सहस्रक चांडाळी त्रिशत म्यां अपारहितें
पुल्कस[*]-वनिता दशशत शैलूष[4]वधूहि पंचशत अहितें १७
वारांगना असंख्या सधवा विधवा रजस्वला नारी
बहु भोगिल्या बळें म्यां पातक संपादिलें असें भारी १८

---

१ कच्ची. २ जन्मीं. ३ स्त्रिया. ४ नटस्त्रियाहि.
* नामविशेष(अंत्यजांतील भेद)यांच्या स्त्रिया. + स्वीकारिता झाला. ॥ पुष्ट. ‡ कल्याण.

नित्य नवी आणावी जी भक्ता स्त्री कधीं न ती मुक्ता
न पुन्हा मजसीं होयिल इतरांसीं भोगिली कसी युक्ता १९
या परि करिता झालों तरुणपणीं सत्य धर्म अत्याग
ब्राम्हण पळोनि गेले केला आसेंजनेंहि मत्याग २०
तरुणहि अनपत्य मग क्षयरोगें फार पीडलों मेलों
पूर्वज पाडुनि नरकीं यमधर्मोज्ञप्त पाप मी गेलों २१
रेतःकुंडीं पचलों अयुत-त्रय मग पिशाच मी झालों
निज पाप-शेष घेउनि जेव्हां या कर्मभूवरी आलों २२
दिव्यशरच्छत निर्जल- देशीं होउनि पिशाच मी भ्रमलों
व्याघ्र अजगरहि पापें झालों वृक विड्वराह मी श्रमलों २३
मग सरठ सारमेयहि होउनि झालों सृगाल वा नवमीं
जन्मीं गवयहि दशमीं मृग मर्कट गृध्र नकुल हे भव मी
तेश पावुनि झालों वायस मग अच्छभल्ल पापानें
वन कुक्कुट खर होउनि मार्जारहि नित्य आर्त तापानें २५
मंडूक कूर्म झालों मीन तथा आखु मी उलूक खग
वनगज पंचविसाव्या जन्मीं हें ब्रम्हराक्षसत्व मग २६
भक्षाया तुज आलों व्याघ्र जसा गांठितो रुरुंस खाया
तारक झालासि मला देता न महासखा गुरुसखा या २७
या ब्रम्हराक्षसत्वीं नित्य निराहारता क्षुधा भारी
केंचें अन्न स्वामी प्याया शुचि नच कधीं मिळे वारी २८
मत्स्मृति वाढविलीत्वां जसि वाढविजे शिखिप्रभा वातें
वा पावलासि कोणा योगें या अद्भुत- प्रभावातें २९

---

१ भोगिली. २ सोडिली. ३ दिव्य-शरत्-शत- देवांचीं शंभरवर्षे. ४ गांवडुकर ५ कुत्राहि. ६ कोल्हा. ७ मुंगुस. ८ जन्म. ९ आस्वल. १० बेडूक. ११ घुबड. १२ सांबरास. १३ उदक. १४ अग्नितेज.

शिवभक्त म्हणे जैसा शंकरप्रभूच्या प्रसाद हसिताचा
समज प्रभाव अद्भुत जो हा मद्गात्रलग्नभसिताचा ३०
कोण शिवाहून इतर भस्माचें तत्व जाणतो भारी
माहात्म्य जसें प्रभुचें भसिताचेंही तसेंचि बा तारी ३१
पूर्वी वत्सम होता विप्र द्रविडांत सत्पथ-भ्रष्ट
शठ तस्कर वृषलिपती पापाचा राशि तनुधर स्पष्ट ३२
तो दुष्कर्मी रात्रौ शूद्रानें मारिला असें घडलें
ग्राम-बहिर्देशीं त्या पाप्याचें शव तसेंचि तें पडलें ३३
भस्मीं लोळुनि घेउनि वपु गेला त्या शवावरुनि कुतरा
इतुक्यानेंचि सुघोरा संसृति झाली तशासही सुतरा ३४
श्रीशिवदूत तयाला न्याया आले विमान आणून
यमदूतातें पिटिती त्याचें अन्यायकर्म जाणून ३५
त्यासि यम पुसे याणें केले अतिपातका नपाहून
नेतां कसें विमानीं ऐशा नरकोचितासि वाहून ३६
वदले शिवदूत यमा भस्म पहा या शवाचिया निटिलीं
वक्षीं भुज-युग-मूलीं याणें निःशेष पातकें पिटिलीं ३७
शंभु-निदेशें आलों त्या भव्यपदास हा यमा न्याया
भस्म-प्रभाव झाला शिवसाचि सदा सहाय मान्या या
यापरि यमधर्मासीं बोलोनि शिवस्वरूप शिवदूत
विप्र अनामय-लोकीं गेले घेऊनि जो भर्सित-पूत ३९
भस्मप्रभाव ऐसा जेणें अतिपातकीहि-नवदेहा
बा स्पर्शलें अकस्मात् तें हें मद्गात्र-लग्न तवदेहा ४०
भस्में खद्रुम गेला जातिस्मर जाहला शिवा समज

---

१ मत्-गात्र-लग्न-भसित-माझ्या अंगास लागलेल्या भस्माचा. २ तरून जाण्यास कठिण. ३ आरोग्यरूप लोकीं. ४ भस्मपवित्र. ५ कल्याणा, किंवा महादेवा. + ललाटीं.

मी नित्य चर्चितों हें याचाचि प्रिय सदैव वास मज४१
तस्मात्-सर्वांघांचें संशोधन परम भस्म जाणावें
हें श्रीशंकर-विभूषण शिवचि असें स्वमनांत बाणावें४२
शिवपूजनांत होतों भस्मातें धरुनि जलजनाभ[1] सित
या चर्चितां शरीरीं हें करितें साधु स्वलजना[2] भसित४३
तो ब्रम्हराक्षस म्हणे वर्णूं कैसें तुतें शिवसमातें
भूदान-सुकृत होतें तेणें हा उगवला दिवस मातें ४४
त्या नृपजन्मीं भूमि ब्राम्हणमुख्यास जी दिली होती
झाली सिद्ध कपाट-प्रोद्घाटन-पटुतरा[3] किली हो ती४५
बदला यम भूदानें जें त्यापुण्येंचि साधुसीं युक्त
पंचविसाव्या जन्मीं होउनि होईल हा पुढें मुक्त ४६
होतें पूर्वभवाऽर्जित सुकृत किमपि तेंचि या फळें फळलें
कळलें सत्संगेंचि स्वच्छ हृदय होय जें अघें मळलें४७
भस्म समंत्रक दे मज विधि याचा सर्व सांग मज बापा
पापापासुनि सोडिव तव शरणागत नसांपडो तापा४८
त्वाहृश सत्पुरुष सकळ-लोक-हितीं रत सदा महामहित
कल्पद्रुमसे दाते श्रित-हित इच्छिति कधींहि न स्वहित४९
हे सत्कथा यथामति लिहिली रामात्मजें भव तराया
सद्भावें श्रोत्यांतें स्वमनांतहि सद्यशें अवनराया ५०

---

## अध्याय १६

श्री-वामदेव सांगे पूर्वीं मंदर-नगोत्तमीं धामीं
होता सुरवर-मुनिवर-नुत जो कालाग्निरुद्र तो स्वामी१

---

१ कमलनाभ. २ शत्रु. ३ कवाड उघडण्याविषयीं अतिकुशला असी.

नथिसंबति नारद वै- श्रवणादि स्फभक्तिमाजि रमते ज्या
तक्षक-वासुकि-कुंडल-धर शोभे सूर्य-कोटि-सम-तेजा १
प्रभुसि पुसे मोक्षाचा जो हेतु सनत्कुमार तो धर्म
सांगे भगवान् पावे श्रवण करुनि सर्व सत्सभा शर्म २
अल्पायास महाफल सर्वांचे सर्व दोष हरपावे
ऐसें रहस्य पुसतां सांगे देत्यासि दोषहर पावे ४
परमेश्वर रुद्र म्हणे मोक्षद धर्मांत धर्म हा भारी
वारी त्रिपुंड्र पापें सर्वा जीवांसि निश्चयें तारी ५
मज नमुनि दग्ध-गोमय- संभव-भस्में त्रिपुंड्र रेखावा
बहु अभ्यास नकरितां पुरुषार्थ स्ववश सर्व देखावा ६
भस्म-त्रिपुंड्र-धारण दुस्तर-संसार-सागरीं सेतू
वत्सा सनत्कुमारा सर्वांच्या भक्तिमुक्तिला हेतू ७
भाळीं त्रिपुंड्र ज्याच्या रुद्राक्ष शिरीं करीं गळां काय
तो चांडालहि उत्तम पूज्य तया मोक्ष सर्वथा होय ८
प्राणी त्रिपुंड्र-धर जो यम नियमानें सदैवही जपला
तपला तीर्थी न्हाला सप्त महामंत्र कोटिही जपला ९
धरिल समंत्र अमंत्रक जो जन भाळीं त्रिपुंड्र तो धन्य
उद्धरिल सहस्र कुलज झाले भावीहि जे पुढें अन्य १०
कोणी त्रिपुंड्र-धारी पावेल न देह सोडितां कष्ट
विधि-लोकीं हर-लोकीं राहेल सुखें नहोइल १नष्ट ११
मग येउनि मल्लोकीं नद जलधिस तेविं पावणार मला
मद्भक्त इतर-लोकीं मित्र-गृहीं जेविं पावणा रमला १२
कथिला परम रहस्य श्रुति-शात-सार त्रिपुंड्र बा सुघडा
श्रद्धा हीन-जनीं बा नकरावा सर्वथैव हा उघडा १३
ऐसें सांगुनि गुप्त प्रभु झाला त्या दया-सुधा-निधि बा.

---

१ घडण्यास कठीण नव्हे असा.

गात अनुग्रह गेला विधिलोकातें सुपुत्र तो विधिचा १४
भस्माच्या संपर्कें झालासि स्वच्छबुद्धि या भाळीं
तुझिया त्रिपुंड्र शोभे जैसा पूर्णामृतांशु आभाळीं १५
श्रीशिवयोगी ऐसें बोलुनियां ब्रम्हराक्षसास बरें
अभिमंत्रुनि दे भस्म स्त्तविलें तें दान सत्सभेंत बरें १६
स्वललाटीं त्या भस्में राक्षस भव्य त्रिपुंड्र तो लावी
दिव्य द्युतितें पावे जी रविरुचिशीं विशंक तोलावी १७
धरितां त्रिपुंड्र भाळीं तत्काळ ब्रम्हराक्षसत्व सरे
तो दिव्यमूर्ति होय द्युति सर्वदिशांत कीर्तिही पसरे १८
त्या सद्गुरुतें वंदुनि दिव्य विमानीं बसोनि हर्षानें
श्रीशिवलोकीं गेला पूजित होऊनि पुष्प-वर्षानें १९
लिहिली कथा यथामति अतिभव्या रामनंदनें रसिकें
कीं हरि-हर-भक्ति म्हणति हेंचि बरें कलियुगीं दुजें नसिकें

---

## अध्याय १७

श्रद्धाचि करिनसे हित धर्माचें जेविं माय तनयाचें
जप तप मख गुरु-पूजा मुख्य श्रद्धाचि आयतन याचें १
श्रद्धेनें भजत्यातें पाषाणहि फलद होय जो अज्ञ
तोही सद्गुरु होतो अश्रद्धेनें वृथा महायज्ञ २
स्पष्ट अबद्धहि मंत्र श्रद्धेनें जपतया जना फळतो
जैसी श्रद्धा तैसी सिद्धि सुपरमार्थ हा बुधा कळतो ३
पांचाल-भूमिपतिचा सुत होता सिंहकेतु या नावें
शक्राचा विजय जसा ज्याचें कविनीं गुणत्व वानावें ४
तो सिंहकेतु आत्मज गेला मृगया करावयास वनीं

---

१ स्थान, उपकरण. २ धर्माचें. + श्रेष्ठें.

नानाजाति-तरु-लता-बहु-पक्षि-श्वापदांचिया भवनीं६
त्याचा शंकरनामा भृत्य शबर एक काननीं शिरला
फिरला तों दिसला बहु जीर्ण प्रासाद भग्न जो चिरला६
तेथें पीठ जयाचें भग्न असें लिंग देखिलें पडलें
मूर्त स्वभाग्य-दर्शनि जाणों सुकृतें पुराकृतें घडलें ७
ऋजु सूक्ष्म शंभुलिंग स्वयहण-प्रेमसार दे शबरा
वाटे त्याला झाला चिंतामणि-लाभ फार देश बरा ८
संप्रेरिला पुराकृत- सुकृतांशोद्भव-वशें शबर वातें
त्या नृपसुतासि दावी जें दे हृदयासि तोष बरवा तें९
नमुनि म्हणे प्रभुजी हें रुचिर श्रीशंभु-लिंग सांपडलें
नकळे वनांत भग्न- प्रासादीं भिन्नपीठ कां पडलें१०
सांगा विधि पूजावें शिवलिंग असें मनांत वाटतसे
मार्गज्ञें उक्त जसे पथिकजन धरिति वनांत वाट तसे११
भूप म्हणे संकल्प प्रथम करावा सदा मग ध्यान
पाद्याचमनार्घ्यांनीं घालावें निर्मलोदकें स्नान १२
गंधाक्षत नानाविध पुष्पें तरुचीं तशींच वेलाचीं
घेउनि नाम वहावीं बिंदळें निवडुनि रम्य बेलाचीं१३
मग धूप दीप भावें नैवेद्य प्रभुसि नमुनि अर्पावा
शंभु चिताभस्माच्या उपहारें करुनि नित्य तर्पावा१४
प्रीतिकर पदार्थ शिवा न चिताभस्मोपहारसा मान्य
प्रेमें पूजन करितां सर्व प्रभु मुक्त होतसे धन्य १५
स्तवन करावें गावें नाचावें प्रभुपुढें न लाजावें
स्पष्ट म्हणावें जाइल सोडुनि सर्वस्व जरि मला जावें१६
सर्वाघाचा होतो प्रभुची होतां दया विनाश बरा

१ आसन. २ चिताभस्म-उपहार-चिताभस्मरूप नजरा
ण्यासारिखा. ३ सर्वपापाचा. ॥ पूर्वी केलेल्या पुण्यांशा
-च्या स्वाधीन अशा.(वातें या शब्दाचें विशेषण.)

मुख्य चिताभस्म नको अन्य प्रभुला तयाविना शबरा १७
रे शबरा किंबहुना अंतर पडतां स्वदेह सोडावा
सोडावा न नियम दृढ भजनें भगवत्प्रसाद जोडावा १८
ऐसें नृपसुत सांगे परिहास-रसें परंतु तें उक्त
स्वीकारी वंदुनि मग जाय गृहीं होय अर्चनीं युक्त १९
स्त्रीसह साधु शबर तो स्वीकृत नियमें सदा परम-हर्षें
त्या नृपसुतोक्त-विधिनें पूजी श्रीशंभुतें बहुतवर्षें २०
एके दिवसीं उघडुनि पाहे जों शैव शबरवर पात्र
त्यांत चिताभस्म नसे प्रभुतें अर्पावयास अणुमात्र २१
शबर चिताभस्मातें शोधाया दूरवर बहु भ्रमला
कोठेंही न मिळालें आला स्वगृहासि अतितर श्रमला २२
ग्रास-विषाद निषाद क्षण निजकर्मासि दोष तो लावी
युक्ति पुसाया करितां स्वसमीप स्वप्रियेसि बोलावी २३
तीतें म्हणे हुडकिली जी नित्य प्रेतपरिचिता भू[१] ती
आजि माझ्या दुष्कर्में न मिळाली लेश परि चिताभूती २४
काय करावें आतां श्रीशिवपूजेसि विघ्न कीं झालां
पूजेविना प्रिये मी वांचेना मृत्यु सर्वथा आला २५
मुख्य चिताभस्मचि कीं दयिते तत्स्वामिचा[२] उपाय नसे
गृहिणि प्रभुशि वहातों मी पंचप्राण हे उपायनसे २६
श्रीगुरु-शासन-लंघन करणें अपराध सर्वथा खोटा
आगस[++] लक्ष वरकडहि एकिकडे एक होय हा मोटा २७
तेव्हां प्रसन्नचित्तें ऐसें सांगे तयास ती शबरी
मत्तनु भस्म वहावें करिल तुम्हांवरि दया सतीश बरी
दीप्त करुनि गृह जळतें न चिताभस्मोपहार लोपावा
कोपावा न स्वगुरु स्वामी सत्वर म्हणाचि हो पावा[+] २९

---

१ भूमी. २ पार्वतीपति. ++ अपराध. + थट्टेने.

शबर म्हणे गृहिणि विषय सेवुनि झाली न कामना-पूर्ती
तरुणी अनपत्या तूं त्यजिसी सर्वार्थदा कसी मूर्ती ३०
स्त्री त्यासि म्हणे यांतचि जीवित-साफल्य हेंचि जोडावें
इतरार्थ त्यागावें देह मग शिवार्थ कां न सोडावें ३१
तुमचें माझें तुमच्या माझ्याहि प्राप्तपुण्य पितरांचें
शिव पूजन करित्यांचें सार्थक्य विलोकित्यांहि इतरांचें ३२
त्या दृढसंकल्पें तो संकल्पा सत्य शबर वाखाणी
आज्ञा दे वेंचाया समर्थी निधि काय न वरवा खाणी ३३
स्नाता अलंकृता ती पतितें वंदूनि पेटवी गेहा
मग आपणा म्हणें हित दहन शिवातेंच भेटवी गेहा ३४
नमुनि प्रदक्षिण करुनि दहनातें प्रार्थुनी विषादीनें
विश्वें जो आठविला धरिलें तत्ध्यान त्या निषादीनें ३५
अनलीं प्रवेश करितां करजोडुनि ती म्हणे घडो सेवा
मम इंद्रियें प्रसूनें होउत तुजकारणें महादेवा ३६
वपु अगरुधूप करणें अक्षत हृदय-प्रदीप वा शर्वा
पावो हा जीव विभो तुझिया पूजेचिया फला सर्वा ३७
मज सार्वभौमपद कीं शक्रपद ब्रम्हपदहि लागेना
मागेना सेवतें दासी हा अन्य अर्थ मागेना + ३८
जन्म घडेल पुन्हा तरि हे हो त्वत्पाद-सारसी अलिनी
तवभजनेंच असावी हृष्टा रविदर्शनें जसी नलिनी ३९
चालो चालत आला तैसाचि पुढेंहि जन्म-नाश-पथ
शंभो वा हे माया न स्पर्शो द्यावि मन्मना शपथ ४०
वपु-सार्थक हो राहो न चिताभस्मोपहार अन्न मनें
ध्यावें तेंचि तुज शिवा त्वच्चरणा शत असोत मन्नमनें
ऐसें प्रभुनें प्रार्थुनि शबरी दृढ-निश्चया शिरे दहनीं

१ देह. २ मीनिषादी. ३ तुझ्याचरणकमलीं. ४ भ्रमरी.
+ सुचें.

भस्म क्षणांत होय ज्वलन व्यापी मृगी जसी गहनीं[1] ४२
शबरहि यत्नें घेउनि भस्म भय धरोनि न स्फुलिंगाचें[2]
स्वस्थमनें पूजन करि दग्ध-गृह-समीप शंभुलिंगाचें ४३
पूजांतीं दयितेतें शबर स्मरला मनांत कीं राहे
पार्श्वीं सदा प्रसादा घ्याया जी समय सविनया पाहे ४४
शबरें प्रिया प्रसाद- ग्रहण-रता जों मनांत आठविली
तोंचि प्रभुनें शबरी पहिली जी ती तसीच पाठविली ४५
शबरी शबरासि दिली तैसीच प्रसुन-वृष्टि-युक्त बरी
जाणों सच्छळ करितो प्रभुलाहि मनांत वाटली न बरी ४६
दयितेतें अवलोकी तो शबर समक्ष भस्म जी झाली
आली तीच नव-तसी श्रीसीतेची कसी नव्हे ओली ४७
भस्माऽवशेष गृह जें तेंहि यथापूर्व शबर तो पाहे
विस्मित तटस्थ राहे माया कीं स्वप्न-भाव हा बाहे ४८
तो स्त्रीस पुसे दयिते मज देखत पावकीं गळालीस
आलीस कसी पेंडी शुष्ककुशांची तसी जळालीस ४९
गृहहि जळालें असतां पुनरपि पहिलें तसें कसें झालें
धालें अग्निजठर कीं भ्यालें हें फिरुनि जड कसें आलें
शबरी सांगे स्वामी केला ज्वलनीं प्रवेश हा मात्र
स्मरतें कांहीं मग मी जाणें न दहन न आपुलें गात्र
निजलीसि असें अवयव जाणतसें स्वस्थ आपुले शमला
श्रम लाभें अमृताच्या तैसा नाहींच तापलेश मला ५२
निजलें होतें जाणों जागी झालें प्रसाद मागाया
शिवपूजांतीं आलें मी स्वामीच्या पदासि लागाया ५३
इत्यादि शबर शबरी विस्मित होऊनि वदति तों आलें

१ अरण्यीं. २ अग्निकणाचें. ३ सखि.

सहसा विमान भास्कर- मंडलसें भव्य उतरलें स्थलें ५४
दूत शिवाचे चवघे अवघे शिवरूप ते वर विमान
घेउनि आले ज्यांतें पाहुनि नधरील देव रवि मान ५५
शबरातें शबरीतें धरुनि करीं बसविती मग विमानीं
तों त्यांच्या दीप्तिपुढें कांहीं निजदीप्तितें न रवि मानी ५६
शिवदूत-करस्पर्शे नत्यजितां देह दिव्यता आली
शबर सखा शक्राचा शबरी इंद्राणिची गमे आली ५७
शिवदूत प्रभुचे जे यापरि बहु दिव्यरूप देऊन
सानंद शबर शबरी गेले श्रीशिवपदासि घेऊन ५८

---

## अध्याय १८

आतां उमामहेश्वर- नाम-व्रत-सत्प्रभाव वानावे
काना वातहि यांचा लागलिया जीव धन्य मानावे १
होता देवरथ द्विज आनर्तीं बहुभला तया तनया
ती शारदाभिधाना रूपवती गुणवती अपोतनया २
तीनें मृतदार धनी शूरकुलज पद्मनाभ यानावें
ब्राम्हण वृद्धहि मागे ज्या सर्वांहीं सदाहि मानावें ३
देता झाला धन्या कन्या त्या परम-रत्न-लोभ्याला
यांचा-भंग कराया देवरथ द्विजहि साधु तो भ्याला ४
माध्यान्हीं पाणिग्रह- विधि विप्र-प्रोक्त आदरें केला
मग पद्मनाभ सांजे संध्येकरितां सरोवरा गेला ५
संध्योपासन करुनि द्विज फिरला तों तमीं तया व्योंळ
डसला डसतांचि पथीं तत्काळ प्राप्त जाहला काळ ६

---

१ सखि. २ कन्या. ३ नटाकिली नीती जीर्णे असी.
४ सर्प. ५ मृत्यु. + याचनाभंग.

त्या पद्मनाभ-मरणें ती बाळा शारदा तिचे पितर
तें दुःख किति वदावें हाय म्हणुनि मोह पावले इतर ७
संस्कारूनि मृतातें गेले स्वस्वस्थळासि ते लोक
वाढे बहुतचि वसतां जनक-गृहीं शारदामनीं शोक ८
झाली क्षीणशरीरा शोकाग्नि करील कां न हुत मास
विधवा होउनि कंठीं पितृसदनीं शारदा बहुत मास[1] ९
द्विज अंध वृद्ध नैध्रुव-नामा त्या देवरथ-गृहा आला
त्याला विधवा कन्या बहु पूजी सुप्रसन्न तो झाला १०
तो द्विज वदला वत्से पतिसह करिसिल विहार तूं सुचिर
तुज एक पुत्र होइल गुणवान् रूपेंकरूनि जो रुचिर ११
लोकीं नय कीर्ति असो विभव भजो तुज सदा जसा दास
माझ्या आशीर्वादें येोग्या हो देवता-प्रसादास १२
ती बाळा त्यासि म्हणे बा आशीर्वाद तव सदा साचे
साक्षात् कल्पद्रुमसे हे करिती पूर्ण नवस दासांचे १३
परि मी विधवा बाळा माझ्याठाईं तुझी तसी आशी
छिन्नलतेवरि जैसी वृष्टि शुनी जेविं सत्क्रिया नाशी १४
मी परम मंदभाग्या मज आशीर्वाद हा कसा फळतो
चळतो स्पर्शमणी बा महिमा दावी न खर्पशीं बळ तो १५
विप्र म्हणे म्या अंधें नेणुनि आशी तुला दिली जरि ती
न रिती पडेल वत्से दास-वचन सत्य शिव-शिवा करिती
कथितों उमा-महेश्वर- भव्य-व्रत हें मुली जपोनि करीं
करिल कृपा सांब असें जें यांत न तेज तें तपो-निकरीं १७
ती नमुनि म्हणे स्वामी उपदेशावें तनू न लक्षीन
करिन व्रत दुष्करही यमनियमातें जपोनि रक्षीन १८
मुनि सांगे चैत्रीं कीं मार्गी[2] उत्तमदिनीं सितीं पक्षीं

1 महिने. 2 मार्गशीर्ष मासीं.

व्रत आरंभावें हें पापीं शिखिनेज तें जसें केशीं १९
तिथि अष्टमी सुपुण्या तेसीच वरी चतुर्दशी श्रेष्ठा
या दोहीं पक्षींच्या सांबशिवाराधनीं अति-श्रेष्ठा २०
मंडप रम्य करावा त्यामध्यें पंचवर्ण सत्सद्म
तन्मध्य धान्यराशि- स्थितकलशोपरि सुवस्त्र शिवसद्म २१
प्रतिमा उमा महेश्वर यांची कांचन-विनिर्मिता भावें
ती पूजावी संध्या- काळीं येणें अभीष्ट लाभावें २२
सांबशिवाचें पूजन नियमानें षोडशोपचारांहीं
हें वर्षभरि करावें नामाहीं सांग होय सोरांहीं २३
विप्राज्ञेनें रात्रौ क्षीर-विभावित हविष्य भक्षावें
वर्षभरि करावें हें व्रत उद्यापनहि इष्ट लक्षावें २४
या सद्व्रत-प्रभावें निःसम पळांत पितर उद्धरती
सांबशिवाच्या भजनीं वृद्धिप्रति पावतीच शुद्ध रती २५
व्रतसुकृतें विधिलोकीं हरिलोकीं प्राप्त होतसे वास
शिवलोकीं कल्पशत स्थिति पावे भक्त त्याचि देवास २६
आला उपदेश मना श्रद्धेनें शारदा धरी चित्तीं
प्रीति व्रतीं बहु तिची लोभ्याची जेविं वाढते वित्तीं २७
जनक जनन्यादि तिचे आप्तहि आले तयांसि तें कळलें
झाले प्रमुदित वदले वत्सेच्छ्रद्धाग्य सर्वथा फळलें २८
सांग व्रत सिद्धिप्रति पावाया तो महर्षि राहविला
कीं गुरुसन्निधिनेंचि प्रारंभपरार्थ पार पावविला २९
तेही गुरुनें कथिल्या मार्गें व्रत आचरावया लागे
मागे पतिसंग मनीं अनुदिन यम-नियम-रक्षणीं जागे
लिहिली कथा यथामति रामसुतें गुरुसि हस्त जोडून

---

१ गयतीं. २ तत्-मध्य- धान्यराशि- स्थित- कलश- उपरि- त्यासत्पद्माच्या मध्यभागीं ठेविलेल्या कलशावर. ३ श्रेष्ठांहीं.

सोडून खलभयातें रसिकाचें मन न लेश मोडून ३१

## अध्याय १९

सांबशिव-व्रत करितां नियमें निर्विघ्न लोटला अब्द
गुरुच्या पद-प्रसादें लागों दिधला न लेशही शब्द १
उद्यापनहि यथाविधि केलें मग विप्र-भोजनहि भावें
गुरुजन वदले वत्से सत्वर तुझिया करासि फळ यावें २
जनक-गृह-समीप मठीं गुरुसन्निध मंत्रजप करित राहे
साहे ती उपवास ध्यानीं श्रीसांब-शिव-चरण पाहे ३
तो नैध्रुवहि उपोषित बसला होता समाधितें धरुनीं
स्मरुनि श्रीगौरीतें श्रीशंभु-प्रार्थना मनीं करुनीं ४
करुनि कृपा विप्रावरि विप्रसुता-शारदेवरिहि देवी
श्रीजगदंबा रात्रौ प्रकटे यश सत्सभा जिचें सेवी ५
प्रकट शिवा होतां त्या अंधासी प्राप्त जाहली दृष्टी
सृष्टि-प्रसू नतीं ती जेसी वत्सीं दयावती गृष्टी[१] ६
तो द्विज जगदंबेच्या पायांवरि पुष्पसेंचि शिर वाहे
ती शारदा धरी श्री-चरण म्हणे आपणांत शिरवा हे ७
त्या दोघातें उठवुनि निरुपम लीला-विलास-सद्मानें
स्पर्शे माथां देवी दुर्गा श्रीमत्-स्वहस्त-पद्मानें ८
विश्वेश्वरी वदे वर विप्रवश व्यक्त काय अर्पावे
वात्सल्यें मातेनें इष्टार्थे भक्त-तोक[२] तर्पावे ९
झालें प्रसन्न-हृदया दुर्लभ देवांसही असें मागा
देतें अभिमत पावुनि गाया मत्कीर्ति-सुरभितें लागा
नमुनि स्तवुनि मुनि म्हणे वरदे परदेवते सदाधारे

---

१ एकदा व्यालेली गाई. २ भक्त बालक.

ब्रम्हादिकांसि म्हणती त्वत्पदपद्में स्मरवें सदा धारे ११
अंधपणीं वदलों या कन्येतें करुनि पतिसह क्रीडा
पुत्रवती हो ऐसें विधवा जाणोनि पावलों ब्रीडा १२
तें माझें आशीर्वच सत्य तुवां मंद पण करवेंच
मातें अल्पहि यश घे धनिक म्हणे मार्गकण करा वेंच१३
भगवति भक्तां आम्हां- विप्राचें जें जगांत यश आहे
तें त्वत्पदप्रसादें लेश न असतां अनुग्रह न राहे १४
जगदीश्वरी म्हणे मी आलें तुमच्या करावया कार्या
हे भामिन्यऽभिधाना होती द्रविड- द्विजातिची भार्या१५
पूर्वभेवीं चातुर्यें रूपें वश्यादिकेंतवें मतितें
मोहुनि वश करिती हे झाली अत्यंत सर्वदा पतितें१६
ज्येष्ठस्त्रीसीं पतिसीं मन मोहुनि पाडिलें इणें विपट
ती अनपत्या मेली पति-विरहें दुःख पावली निपट१७
त्या पापें या जन्मीं हे विधवा विप्रसत्तमा झाली
कीं ज्येष्ठ- सपत्नीचा करितां घात न मनांत हे भ्याली
ज्या पति-पत्नी विप्रिय हे लोकीं जोडिती महापाप
त्या होति बालविधवा जन्में निःसीम भोगिती ताप १९
सेजारी विप्र तरुण ईच्या संगार्थ फार यत्न करी
या सुंदरीस पाहुनि कामार्तांचें कुचित्त हस्त धरी २०
नेत्रें करूनि शोणें ब्राम्हण झिडकाविला इणें रोषें
मेला हाय म्हणत तो ईच्या अप्राप्ति-संभवें दोषें२१
याजन्मीं तोच इचा पाणिग्रह करुनि पावला मरण
वैधव्य-दुःख-दायक झाला नव्हतें हि जरि तया स्मरण
त्याजन्मीं परि मातें भजली होती तयास्तव स्वल्प

---

१ लज्जा. २ परंतु. ३ पूर्वजन्मीं. ४ वैमनस्य, वांकडे पणा. ५ अत्यंत. ६ एकवीस.

घडला भोग मुनिवरा लागावा स्पष्ट अन्यथा कल्य २३
प्राग्जन्मपति इचा जो तो द्विजवर पांड्यजनपदीं झाला
श्रीमान् सदार सात्मज आहे स्वप्नीं भजेल हे त्याला २४
सार्ध-त्रिशत-दशोत्तर योजन येथून दूर तो आहे
स्वप्नीं इजसीं नित्य क्रीडेल म्हणेल नच कधीं हा हे २५
स्वप्नींच्या पतिसंगें होइल या एक पुत्र मुलगीतें
तो निववील पितरांतें आत्मयशें सर्व-सुकवि-कुल-गीतें
स्वप्नींचा पति संगें पुरविल अभिलाष तो विलासाचा
त्या स्वकृत स्वपरिग्रह तेसाचि कळेल पति इला साचा
पूर्वभवीं आराधन माझें याही भवीं इला घडलें
झडलें पातक केवळ अस्मत्ध्यानींच मन इचें जडलें २८
यास्तव वरदान इला अर्पीया प्रकट जाहलें आहे
तर्पीलचि वृष्टि करिल जरि लक्षुनि मार्ग चातकी आहे
ऐसें मुनिसीं बोले मग देवी शारदेसि हें सांगे
वत्से मी भक्तजना पावेना शरण आलिया कां गे ३०
स्वप्नीं अनुभव ज्याचा येइल तो परम प्रिय तुझा कर्ता
हर्ता त्वत्तापाचा दैवें भेटेल जेधवां भर्त्ता ३१
सुतरत्न व्रतसुकृतहि तूं देवुनि तत्करीं तयाजवळ
वस वश होउनि वत्से होइल कलियुगहि सद्यशें धवल
प्रत्यक्ष अंगसंग स्वप्नांवांचुनि कधीं नसावा गे
वागो तव देह जसा पतितीं स्त्रीचा अधीनसा वागे ३३
त्वां सहगमन करावें जेव्हां पावेल मृत्यु पति तनये
शिवपद वरिशील भवीं जेथुनि होऊनि भक्त पतित नये
ऐसें कथुनि अदृश्या होय शिवा शारदा तया गुरुतें
नमुनि म्हणे बा साधुनि दिधलें त्वां त्रिभुवनांत जें गुरु तें ३५

---

१ पतीला. २. स्वस्त्री. ३ मोठें.

नैध्रुव मुनि एकांतीं जगदंबेनें प्रसाद जो केला
कर्णी कथुनि सदारा देवरथा पुसुनियां तया गेला ३६
ती शारदा प्रतिक्षण पावे स्वप्नांत कांत-संगातें
वरदान भगवतीचें वर्णी सप्रेम नित्य गंगा तें ३७
मग झाली गर्भवती ग्रामस्थजनासि कर्म तें कळलें
मळलें पितृ-मुख म्हणती धिक् कुलजे मन तुझें कसें चळलें
जो सर्प दृष्ट मृत पति कोणी पाहति बरे न तज्ञाती
स्पष्ट भ्रमली गमली कुलटा सर्वा जना अतज्ञा ती ३९
ती शारदा सभेंत क्रोधें आणूनि करिति बभ्रा ते
दभ्रा तेव्हां गमली मृतिहि भ्राते खरेंच अभ्राते ४०
म्हणती पापे जारिणि उपजतचि न पावलीस कां मरण
तुज विधवेसि कसा गे आठवला नरक-हेतु कांमरण ४१
कोणी वदले नासा- कर्ण छेदन करूनि सोडावी
बोडावी किनि वदले किति म्हणती हे कुबुद्धि झोडावी
ऐसे वदले झाले सिद्ध करायासि तों न भोवाणी
गगनीं प्रकटे आणी प्रेमळ-नयनांत तत्क्षणीं पाणी ४३
जनहो मन हो तुमचें न भ्रांत स्त्री सती न गांजावी
धैर्य पहातांचि इचें त्यजुनि अहंता महानगां जावी ४४
स्वप्नींहि इच्या केलें न कुळ मळायासि पापलेश मनें
हे जेथें तेथें नच धाडावे दूत आपले शमनें ४५
यावरि म्हणेल जो या साध्वीतें जारिणी असें दुष्ट
तत्क्षणिं चिरेल त्याची जिव्हा प्रकटेल तन्मुखीं कुष्ट ४६
साधु म्हणेल तया या परलोकींही सुखा मग न वाणी
ऐसी झाली सहसा आयकिली त्या जनें गगन-वाणी ४७
देवरथ सदार तया वाणीतें श्रवण करुनियां हर्षे

---

१ कमनाई. + यमधर्मानें.

होउनि नतमुख सज्जन सर्व प्रेमाश्रु तेधवां वर्षे ४८
त्यांत किति अविश्वासें वदले वाणी मृषाच हे वाटे
फाटे त्यांची जिव्हा कृमिकुलही तत्क्षणीं मुखीं दाटे ४९
जन सर्व शारदेचें लागे प्रार्थुनि सभाजन कराया
तत्ताता धन्य म्हणति जैसी सज्जन-सभा जनकराया ५०
बहु साधु साधु वदले वृद्ध ज्ञाति स्त्रिया तिला लोभें
आलिंगुनि समजावुनि म्हणती वत्से सुकीर्तिनें शोभें ५१
किति जन म्हणती दैवत मिथ्या नवदेचि नियम हा भारी
गर्भवती होऊनिहि शीलभ्रष्टा कसी न हे नारी ५२
ऐसें तेव्हां झालें सभ्यहि जनचित्त संशयाविष्ट
शिष्ट ब्राम्हण बोले जैसा आम्नाय बोलतो इष्ट ५३
श्रुत दृष्ट विश्व जें हें मायामय यांत सर्वही घडतें
अडतें विधिमन जेथें कार्य न मायेसि लेशही जड तें ५४
वीर्य विभांडक-मुनिचें नद्युदकसमेत[1] तें मृगी प्याली
व्याली महर्षितें हें कर्णीं कविवर-मुखें कथा आली ५५
मुनि-मंत्रबळें झाला युवनाश्वनृपासि गर्भ हे हि कथा
अत्यद्भुता पुराणीं तुमच्या आली असेचि कर्णपथा ५६
तैसीच सुराष्ट्र-नृपति- हस्त-स्पर्शें मृगांगना धाली[2]
झाली गर्भवती ती तत्काल स्नतापसा स्नता व्याली ५७
तैसी हेही नैध्रुव- मुनि-पद-भजनें महाव्रताचरणें
झाली गर्भवती हें जी माया शांभवी तिचें करणें ५८
या अर्थी एकांतीं अमांच्या शुद्धकीर्ति ज्या भार्या
त्या शारदेसि मान्या अन्याहि पुसोत बायका आर्या ५९
या पूज्य-पुरुष-वाक्यें एकांतीं शारदेसि ज्या सुसती
गर्भ-प्राप्ति अकस्मात् वद वत्से तुज कसी असें पुसती

1 नदी-उदक-समेत- नदीच्या पाण्याबरोबर. 2 तृप्त झाली.

ती सद्गुरूपदिष्ट- व्रत-माहात्म्येंकरूनि जो घडला
गौरी-प्रसाद सांगे त्यांच्या विश्वास मानसीं जडला ६१
गर्हिवरस्त्या बहु साध्वी त्या वदल्या शारदेसि तूं धन्या
अन्या बहु कुलजन्या परि वत्से त्वत्समा नसे कन्या ६२
आधीं पुष्कळ नेणुनि तें कन्यारत्न अनघ रागेले
मग साधु साधु वदले बहुमान करूनि जन घरा गेले ६३
ती प्रसवली पितृगृहीं शुभकाळीं शारदा स्व-तनयातें
द्विज वदले मद लेशहि धरिल विलोकुनि शचीसुतनयातें
उपनयनांत सुसमयीं केले संस्कार सर्व आजानें
वरचि करील हित म्हणे याचें होईल काय माज्यानें ६५
ऋग्वेद अष्टमी ये पाठ यजुर्वेद रविसमा नवमीं
ज्या सामवेद दशमीं त्याहि म्हणों काय कविसमानव मीं
गोकर्णातें यात्रा शिवपर्वी सुकृत-संचयें नेली
पितृ-मातृ-बंधु-सहिता सस्कृता ती शारदा स्वयें गेली ६७
स्वप्नीं संग जयासीं तो आला पूर्व-जन्म-पतिहि तथा
ती शारदा विलोकी दर्शन तीचेंहि होय अति हित या
स्वप्न-परिचित स्वपती स्पष्ट असें शारदा-मनीं वाणे
तोही विप्र स्वस्त्री स्वस्तत असें स्वप्न-परिचयें जाणे ६९
रोमांचित-तनु होउनि त्याचिकडे शारदा सती पाहे
राहे चित्रसम उभी जळ खळखळ लोचन-द्वयें वाहे ७०
तो विप्र म्हणे भद्रे काहीं पुसणें तुला मनीं आहे
एकांतीं चाल असें बोलों एकीकडे तिला वाहे ७१
एकांतीं वृत्त पुसे गर्हिवरलिस दर्शनें म्हणे कां गे
निज-कुल-नामहि दुःसह वैधव्य प्रभृति दुःख ती सांगे
पुनरपि हास्य करुनियां कौतुकि ब्राम्हण असें पुसे तिस तो

भद्रे वद कोणाचा हा पुत्र सुरूप चंद्रसा दिसतो ७३
ती शारदा म्हणे हा मन्नंदन शारदेय या नावें
मानावें बहु यातें मेधाविशतें सदैव वानावें ७४
विप्र म्हणे भद्रे तूं जरि म्हणसी पुत्र आपुला याला
वदलीस बाळविधवा मीं ऐसें पुत्र हा कसा झाला ७५
ऐसें विप्रें पुसतां नम्रमुखी होय शारदा लाजे
राजे म्हणति कवींचे लवली लवलीलता तसी साजे ७६
ती धैर्य धरूनि म्हणे झाला उपहास बहु पुरे स्वामी
मज जाणतसांच तुम्ही जाणतसें निश्चयें तुम्हांला मी
किंबहुना याअर्थी तुमचें माझें प्रमाण मन आहे
ऐसें बोले सांगे श्रीदेवीदत्त वर सती त्या हे ७८
मग शारदा तयाच्या सुतरत्न व्रतफळार्ध दे हातीं
तद्दर्शनें निवे तो निववी तत्-स्वजन-चित्त देहा ती ७९
तो विप्रजनकजननी बंधु-स्त्री स्वजन-संमतें जाया
स्वीकारी तात सुखें आज्ञा त्या शारदेसि दे जाया ८०
त्या पूर्वजन्म-पतिच्या सदनातें शारदा सती गेली
केली स्वप्नींच तसी त्या विप्रें श्री-शिवा-वरें केली ८१
त्या शारदा सतीचें सर्वजन करिति सदा सभाजन हो
कीं तीस शिवा वदली वसे कवि-नुत-पदास भाजन हो
करुनि विलास स्वप्नीं त्या विप्रगृहीं वसोनि बहुवर्षें
मग अवसानीं त्यासह शिरली दहनांत ती परम-हर्षें ८३
पतिसह बसुनि विमानीं श्री शिवलोकास ती सती पावे
यावेदसमाख्यान- श्रवणें जन-दोष सर्वही जावे ८४
लिहिली कथा यथामति रामसुतें सत्प्रसाद जोडाया
थोडा पाहुनि स्मरतरु- महिमा लोकीं नसेचि जोडा या ८५

---

१ नामविशेष (अद्वी) तसी. २ क्रीडा. + बायको.

# अध्याय २०

सूत म्हणे अति-जड-हित शंभु-भजन-अन्य शौनका नाहीं
रुद्राक्षाचा महिमा भाशावा धरुनि मौन कानाहीं १
भक्त अभक्तहि नीचहि नीचतरहि सर्व सर्वथा जरि तो
प्राणी पापापासुनि सुटतो रुद्राक्ष जो सदां धरितो २
रुद्राक्ष-धारण परम- पुण्य महाव्रत असें म्हणति सुकवी
चुकवी जन्म मरण हें कामाद्यखिलारिचें वदन सुकवी३
रुद्राक्ष-सहस्रातें धरितो जो नमिति सुर तया सर्व
तो तैसाचि प्राणी वंद्य अशेषा जना जसा शर्व ४
नसतां सहस्र एकचि रुद्राक्ष शिखेंत मनुज जो धरिल
बारा बारा हस्तीं सोळा सोळा भुज-द्वयीं वरिल ५
बत्तिस कंठीं चाळिस माथा सा सा तसेचि कर्णांत
वक्षीं अष्टोत्तरशत शिवसम तो पूज्य सर्ववर्णांत ६
स्फटिक-प्रवाल-मुक्ता-वैडूर्य-स्वर्णमणि इहीं युक्त
रुद्राक्षातें धरितो जो संसारीं असोनि तो मुक्त ७
केवळ रुद्राक्षचि जो निर्धन कीं मनुज आळसी धरितो
जेविं तमाचा भास्कर पापाचा होय सर्वथा अरि तो ८
जपला रुद्राक्षाच्या माळेनें मंत्र जपरतें जो तो
क्षिप्र अनंत-फल-प्रद सर्व-रहस्यज्ञ-जनमतें होतो ९
रुद्राक्ष शिरीं धरितां श्री-गंगा-स्नान-फळ सुखें मिळतें
तत्वज्ञ जन-मतें तों अधिकचि होयील तोलितां निळतें१०
ज्याच्या बहुपुण्यप्रद रुद्राक्ष नसेल एकही अंगीं
त्याचें जन्म निरर्थक जैसें नवसोनि साधुच्या संगीं ११
शिवलिंग-पूजनीं जें तें फल रुद्राक्ष-पूजनीं आहे

---

१ वाळवी. २ महादेव. ३ वक्षस्थळीं.

हें सूत रहस्य कथी भूतदयेस्तव न तन्मनीं राहे १२
एकमुख पंचमुख किति एकादशमुख समस्त सन्महित
रुद्राक्ष चतुर्दशमुख हे शिवसम करिति भक्त-जन्महित
रुद्रात्मक रुद्राक्ष प्रेमें जरि नित्य पूजिला तरि तो
करितो जन्मदरिद्रा धनपतिच दुरित कुलक्षणें हरितो १४
याविषयीं आख्यान श्रवण करावेंचि निज-हित-प्रवणें
सर्व महापाप-क्षय करितें तत्काल कीर्तन श्रवणें १५
काश्मीर-देश-पालक राजा तो भद्रसेन या नावें
ज्या गुण-संपन्नातें राष्ट्रें सप्रेम नित्य वानावें १६
ज्याचा पुत्र सुधर्मा तारकनामा तदीय-सचिवाचा
ज्यांची मूर्ति सुराच्या पुत्रींहि रसींहि लाज रचि वाचा
नृप-सचिव-कुमार सखे सुगुणांहीं स्वजन-मानसें हरिती
विद्याभ्यास क्रीडा दोघे एकत्र सर्वदा करिती १८
रत्न-सुवर्ण-विभूषा क्षणभरि निज-गुरुजनाग्रहें धरिती
परि तीव्र-विरक्ति-रसिक सादर रुद्राक्ष-भूषणें वरिती १९
त्या भद्रसेन-सदनीं मुनिवर्य पराशर स्वयें आला
त्याला पूजुनि नृप तो अंजलि जोडुनि विचारिता झाला २०
हा मत्पुत्र सुधर्मा सुज्ञानें मृत्युजन्म नाशील
हा सचिव-पुत्र तारक पाहें याचेंहि सन्मना शील २१
रुद्राक्षाऽलंकार प्रिय यांला या दशेंत कां गमला
आंग मला तेंवि नगा देति न हें काय तत्व सांग मला २२
सर्वज्ञ मुनि म्हणे या दोघांचें पूर्व वृत्त तुज राया
कथितों मी श्रोत्यांची श्रद्धा भक्ति क्षणांत उजराया २३
नंदिग्रामीं बहुगुण-रूपें धन्या गणांगना होती
तन्नाम महानंदा सेवी जो धर्म जातिचा तो ती २४

---

१ स्वहिताविषयीं नम्रानें.

राज्ञी जसी प्रजांहीं ती पूजावी सदैव गणिकांहीं
नव्हतें देहीं गेहीं स्वल्प जिच्या प्राज्य मूल्यमणि कांहीं२५
त्या वेश्येनें मर्कट कुक्कुटहि तसाच बाळसा राया
नाचायासि शिकविलें होतें क्रीडोनि काळ साराया२६
मर्कट रुद्राक्षांहीं भूषित केला असे जसा बाळ
तैसाच कुक्कुटहि ती नाचवि दोघांसि धरुनियां ताल२७
कोणीएक शिवव्रत- रत सर्वांगीं विभूतिनें न्हाला
धृत-रुद्राक्ष-विभूषण जटिल असा वैश्य तद्गृहा आला
भुलली वेश्या त्याच्या करगत-वलयें अमूल्य-रत्नमयें
वाटे तच्चित्ता कीं घडिलें कंकण करूनि यत्न मयें२९
गणिका वैश्यासि म्हणे अंशीं एकींहि कटक हें न रितें
हरितें मम चित्तातें चुंबकसें स्ववश चक्षुतें करितें३०
वैश्य म्हणे घे देतों जरि तव मन रत्नकंकणीं लोल
बोल स्पष्ट गुणज्ञे याचें देतीस काय तूं मोल ३१
स्मित करुनि ती म्हणे हो नरतनु अधिकचि गुणें न मणि कांहीं
त्रिदिन तव वधू होइन कीं द्यावें हेंचि मोल गणिकांहीं३२
वैश्य म्हणे साक्षी या व्यवहारीं चंद्र रवि महाभूतें
शपथ करीं कीं सत्यें चाले व्यवहार रथ जसा सूतें ३३
घे वीरवल्लभे कर- भूषण माझी त्रिरात्र हो भार्या
वर्तावें मजसीं त्वां वर्ते पतिसीं जसी सदा आर्या३४
वैश्याच्या हृदयातें स्पर्शुनि ती शपथ करि महानंदा
मग तें रत्न-वलय घे भास्कर-भा हो जयापुढें मंदा३५
मणिमय शिवलिंग करीं दे वैश्य तितें म्हणे करीं जतन
वतन प्राण तसें हें याच्या नाशींच मत्तनू-पतन ३६

---

१ मयास्करें. २ सस्पृह, इच्छायुक्त. ३ हातीं.

ती वेश्या तें लिंग स्थापी त्या नाट्य-मंटप-स्तंभीं
केलिगृहीं जाय जसी गजसहित गजी सरोवर स्वंभीं ३७
दांतीं पर्यंकीं त्या वेश्यासीं करुनियां सुखें केली
निबुनि महानंदेनें निद्रा सुस्वस्थ-मानसें केली ३८
अग्नि निशीथीं दैवें सहसा त्या नाट्यमंटपा लागे
जावुनि वेश्या सोडी कुक्कुट मर्कट जरी स्वयें भागे ३९
त्या नाट्यमंटपासह तें लिंग जळोनि जाहलें भग्न
शोकार्णवांत झाला तो वैश्य महाशिवव्रती मग्न ४०
वैश्य म्हणे स्वप्नींही नेकावें लिंग भंगलें कानीं
वेंचावेंचि शिवार्थीं पिन्नर्थीं जेंवि अंग लेंकानीं ४१
विधि हरिहि न वाराया शकतिल दयिते करीव आशु चिता
सत्य मज महानंदे देयिल दहनप्रवेश आशुचिंता ४२
दृढतर निश्चय जाणुनि ती वेश्या वैश्यसत्तमा उचिता
स्वगृहासमीप करवी सांगुनि भृत्यासि चंदनें सुचिता ४३
स्नान करुनि भस्म धरुनि मौन वरुनि शंकरातें मनीं स्मरुनी
बहुजन देखत असतां वैश्य जळे सविधि पावकीं भरुनी
दुरवार्ता ती वेश्या बंधुजनातें म्हणे अहो क्षिप्र
प्रार्थुनियां पाचारा नंदियामस्थ सर्वही विप्र ४५
सर्वस्व दान देउनि करितें वैश्यानुगमन मी जाणा
मेला शिवव्रती हा मत्पापें सत्य हें मनीं आणा ४६
मणिकंकण घेउनियां झालें याची त्रिरात्र मी पत्नी
सहधर्मचारिणीनें नचुकावें पतिहितार्थही यत्नीं ४७
धर्मार्थकामसत्यें मुक्ती अत्यंत दुर्लभा पण ती
सत्यचि हरि हर सत्कवि सत्यें सर्व प्रतिष्ठित म्हणती ४८

---

१ क्रीडागृहीं. २ सरोवर-स्क-अंभ- सरोवरसंबंधी उत्तम उदकीं. ३ हस्तिदंताच्या. ४ मध्यरात्रीच्याठाईं. ५ आसमंता त्‌शरुद्धता. + क्रीडा.

ऐसें वदली वेश्या बंधुजनें बहु निवारिली तरि ती
न रिती उक्ति पडाया झाली शिष्टोक्त सिद्धता करिती४९
आप्तांतें समजावुनि वेश्या तीर्थादिकीं करी स्नान
सर्वस्व दान देवुनि सद्दिप्राकारणें धरी ध्यान ५०
सांब ध्यावुनि घाली दीप्ताऽनल तीन वेळ उजवा ती
प्रभुसि म्हणे मम नाडी ओवाळाया असोत तुज वाती५१
होतो धन्य स्त्रीनहि जो जन ज्याचा मनें पदा शिवतो
दहनांत शिरावी जों तों प्रकटे तीपुढें सदाशिव तो ५२
प्रभुच्या अनुग्रहेंचि प्रभुतें उघडुनि लोचनें पाहे
राहे परि चित्रतसी क्षण भय मग सुख अनंत ती लाहे५३
शंभु प्रसन्न होउनि सज्जन-शत-वर्णनीय वदला हें
ऐक महानंदे तूं सत्वादया शुद्ध-कीर्ति-पद लाहें ५४
कोण असी अन्य स्त्री सर्वस्वाहूनि अधिक सत्य जिला
धन्या स्त्रु महाभागा तूं कीं त्वां मुख्य धर्म न त्यजिला५५
झालों वैश्य पहाया कीं करिसी भक्ति कसि कसा धर्म
छळ केला परि तुझिया सत्वें मी फार पावलों शर्म ५६
पर-धन-लुब्धा असती असती बहु-कपट-पंडिता गणिका
तूं सत्य-धर्म-निरता लघुहि बहुमता जसी सुधा कणिका५७
दहनीं शिरलीसचि तूं जेव्हां निश्चय तुवां बरा केला[2]
तव कीर्तिची धवलता स्त्रुभगे कोणाहि ये न राकेला५८
द्रवलों लवलों तव-उप- कार-भरें इष्ट तूज अनघे तें
देतों वर मागचि जें व्हावें आयुष्य भोग धन घे तें ५९
नमुनि महानंदा ती प्रभुसि म्हणे आयु भोग धन नाकीं
वास सुधाहि मज नको सर्वहि हे हेतु मृत्यु-जनना कीं ६०
स्वामी त्वत्पादाऽब्ज- स्पर्शाचा मात्र काम दे वर हा

---

१ जारिणी. २ पूर्णचंद्रयुक्तरात्रीला.

स्व-पद-छायेंत म्हणसि दीनातें तूंचि वामदेव रहा ६१
मज सर्व-दास-दासी- बंधुजनासह समस्त-वरदेशा
स्वपदीं ने निजदेशीं यावरि धाडूनकोंचि परदेशा ६२
ऐसें वेश्या विनवी प्रभुतें पायांकडेचि पाहून
प्रभुनें स्वपदीं नेली सुविमानीं स्वजन-युक्त वाहून ६३
शिवलोक महानंदा वेश्या पावे असी अगा राया
तो मर्कट मग मेला पुण्यें आला तुझ्या अगारा या ६४
रुद्राक्ष-धारणानें कुक्कुट झाला प्रधान-सुत राया
होइल संसार-नदी श्रीशिवभजनें करूनि सुतरा या ६५
सांगे असें पराशर मुनि जें रुद्राक्ष-धारणीं फळ तें
गळतें अघ या श्रवणें कळतें हित जन्ममरण हीं टळतें ६६
ऐसी कथा यथामति लिहिली ही रामनंदनें नमुनीं
श्रवणें इच्छ्या निवविले पूर्ण करुनि काम नंदनें नमुनीं

---

## अध्याय २१

श्रीमत्-पराशरातें नमुनि म्हणे भद्रसेन बापा या
संसारीं पुरुषार्थ- प्रासादा साधुसंग हा पाया १
कथिलें परम रहस्य ज्ञानिवरा हें तुवांचि सांगावें
सर्वज्ञा तुज आम्हीं साक्षात् शिव म्हणुनि मग न कां गावें २
वर्णिति वेद पुराणें तीर्थाऽधिक म्हणुनि साधुच्या संगा
इतरांची काय कथा सत्संगा वांछिती स्वयें गंगा ३
वा या मत्सुताचें जें काय भविष्य तेंहि आयकिव [१]
सद्रसना जसि विनती तसि न करी औरसींहि मायकिव

---

१ काकळूत, दया.

त्यासि मुनि म्हणे पडला संकोच मला भविष्य सांगाया
आंगा याचा श्रवणें कंप असें पुससि उग्र कां गा या ५
भूप म्हणे मुनिवर्या हा दास तुला अधीर कां गमला
करिसिल वा तूंचि दया मत्पुत्राचें भविष्य सांग मला ६
मुनिराज म्हणे झालीं वर्षें जन्मोनि आजि बारा या
सप्तम दिवसीं आहे मरण तुझ्या नंदनासि बा राया ७
त्या कालकूटतुल्यें वचनें पावे नृपाळ मोहातें
केला सावध मुनिनें अतिपुण्यें स्पर्श करुनि तो हातें ८
देउनि अभय कृपाऽमृत- सिंधु पराशर दयापर महर्षी
सांगुनि सदुपाय करी तत्काळचि तो तया परम हर्षी ९
सर्वार्थें परम शिवें ब्रम्हा निर्मुनि दिले तया वेद
रुद्राध्याय हि दिधला ज्यातें जपतां उरें न ये खेद १०
सर्वोपनिषत्सार श्रीरुद्राध्याय दोष जाळाया
टाळाया मरणातें क्षम हा श्रीशंकर भक्त पाळाया ११
विधि विनविला यमानें निर्विघ्न स्वाऽधिकार चालाया
कीं दंडार्ह असावें नरकीं बहु पाप जीव घालाया १२
विधिनें दोन अविद्या- कन्या निर्मूनि यां दिल्या त्याला
अश्रद्धा दुर्मेधा सकृतपथीं घालितां तया घाला १३
श्रद्धा मेधा नामें विधिच्या सर्वसन्मता तनया
रुद्राध्यायफळातें पात्र करिति सदृढनिश्चयें जन या १४
रुद्राऽयुताऽभिमंत्रित पुण्यजळें स्नान यासि घालावें
अयुताऽब्द रोम याचें मृत्युबळें एकही न हालावें १५
रुद्रायुताभिषिक्त त्वत्सुत पाळिल धरा अयुतवर्षें
पावेल शिवपदातें पूर्वज उद्धरुनि हा परम हर्षें १६
भूप म्हणे बा मज दे करुनि अनुष्ठान दान तनयाचें

---

१ हर्षवी: २ सर्व-उपनिषत्-सार. ३ यमाला.

दास्य स्वीकारूत प्रेमें त्वत्प्रभृति साधुजन याचें १७
तो मुनि तें मान्य करी सद्ब्राम्हण बहुसहस्त्र आणवुनी
त्या सदनुष्ठानातें प्रारंभी धर्मकृत्य जाणवुनी १८
सप्तमदिवसीं करिती अभिषेक यथोक्त जों महाविप्र
मूर्छित होय नृपतनुज पळभरि मग सावधानही क्षिप्र १९
पुसतां कुमार सांगे उग्र पुरुष मज वधावया आला
झाला मोह पहातां दंडधरा अतिभयानका त्याला २०
तोंचि महावीर पुरुष आले धावोनि तो तिहीं धरिला
पाशें बांधुनि सहसा मग येथुनि दूर तत्क्षणीं हरिला २१
इतुकें पाहुनि झालों मुनिहो मी सावधान भय नाहीं
काहीं आतां आहें स्वस्थ विलोकुनि तुम्हांसि नयनाहीं २२
त्यातें पराशरादिक सन्मुनि ते करुनि वृष्टि आशांची
सुखविति ज्यापुढें बहु कीर्ति उणी अमृत- तोयराशींची २३
भूपें नमुनि प्रेमें रत्नाऽलंकार भव्य लेवविले
जेववुिले मणि-कांचन- राशि नयां ब्राम्हणासि देवविले २४
भोजन करुनि सभेंत क्षितिपति तो भद्रसेन जों बसला
तों श्रीनारद आला ज्याचा महिमा जगत्त्रयीं वसला २५
कनकासनीं समर्चुनि नमुनि शिरें पाय तो पुसे राय
सांग सविस्मय[1] दिससी बा त्वां आश्चर्य देखिलें काय २६
देवर्षि म्हणे राया गगनपथें उतरतां नवल भारी
अवलोकिलें कशी तें तुजसह हे सत्सभा श्रवण सारी २७
मृत्यु तुझ्या पुत्रातें आलाहोता स्वयेंचि माराया
बा राया त्या शंकर- प्रभु धाडी वीरभद्र वाराया २८
तो वीरभद्र भगवान् सहसा गांठुनि मृत्युला रागें
बांधुनि घेवुनि जाय प्रभुपार्षद त्यासि ताडितां मागें २९

१ आश्चर्ययुक्त.

तें जाणुनि यमधर्महि नमुनि म्हणे वीरभद्रजी याचा
अपराध काय सांगा राजाचा सुत गतायु तो साचा २०
श्रीवीरभद्र वदला अपराध कसा यमा नसे याला
रुद्र-स्नान-गताऽशुभ अयुतायु नृपाळ-पुत्र कीं झाला ३१
संदेह असे तुज तरि सत्वर तो चित्रगुप्त आणावा
अगतायु भद्रसेन क्षितिपतिसुत कीं गतायु जाणावा ३२
स्मरतांचि चित्रगुप्त- प्रकटे त्यातें यम स्वयें बा गा
आयुष्य तवसुताचें पुसता झाला नृपा महाभागा ३३
प्रथम द्वादशवर्षे ऐसें बोलोनियां उगा राहे
पाहे नीट विचारुनि नृपसुत अयुतायु मग म्हणे आहे ३४
यम भिवुनि वीरभद्रा चुकलों ऐसें म्हणोनि कर जोडी
करुनि कृपा अभय नृपा देवुनि तो प्रणतमृत्युतें सोडी ३५
मुक्त यम स्वस्थाना केला मीं वीरभद्र जाय नृपा
मी तवसदना आलों प्रभुची तुज जाणवावयासि कृपा ३६
रुद्राऽयुताऽभिमंत्रित- तीर्थस्नानेंचि मृत्यु ओसरला
त्वत्पुत्र अयुतजीवन झाला बा दोष सर्वही सरला ३७
ऐसें सांगुनि नारद राजाचा हरुनि ताप गेला हो
त्याची कीर्ति म्हणतसे देवांच्या आलि आपगेला हो ३८
यापरि काश्मीरनृपति रुद्राध्यायाचिया प्रभावानें
केला पूर्णमनोरथ ऐसा अमृतांशुच्या न भावानें ३९
लिहिली कथा यथामति रामसुतें नमुनि संतरायांनें
हे हरि-हर-यश गातां बाधों देती न अंतरायांतें ४०

---

१ सखि. २ चिघ्नांतें.

# अध्याय २२

सूत म्हणे मुनिहो जे नाना-पातक-समृद्धिनें युक्त
ते होतात शिव-कथा-श्रवणें तत्काल सर्वही मुक्त १
याविषयीं इतिहास श्रवण करा परम पुण्यही आहे
याच्या श्रवणें पातक लघु गुरुहि असो न लेशही राहे २
प्रख्यात दक्षिणा-पथ-देशीं बाष्कल असें जया नाम
ग्राम कु-शूद्र-जनाचा चौर्य-व्यभिचार-दुष्क्रिया धाम
तेथें बिंदुग नामा वेश्यापति विप्र अधम पापरत
न म्हणे कोणीहि तया ऐसें कीं त्यजुनि कुपथ हा परत ४
त्याची पत्नी तरुणी ती नामें वंजुला तिला सोडी
जोडी गणिका-संगति बिंदुग पाहे गृहीं न ती गोडी ५
पति गणिकेसींच रमे न धरी चित्तांत लेशही व्रीडा
ती वंजुलाहि तरुणी जारासीं सर्वदा करी क्रीडा ६
तो जारसंगतीतें विप्राधम बिंदुग स्वयें पाहे
साहेना तें तीतें ताडी कीं ती न सत्पथीं राहे ७
भय न धरुनि कोपें ती-पतिस म्हणे परम मूढ तूं गमसी
मज तरुणीतें त्यागुनि वेश्येसीं सर्वदा कसा रमसी ८
तुज ती वेश्या न सुटे माझी गति काय तूंच सांग मला
अपराध आपला कां न गमे स्त्रीचाचि फार कां गमला[१] ९
तो अधम म्हणे भार्ये सत्य वदसि मंतुला न तूं पात्र
गात्र व्यर्थ न अर्पीं जारापासूनि वित्त घे मात्र १०
जें जार तुला देतिल धन तें सर्वहि मलाचि अर्पावें
त्वां आपणासि विषयें त्याहीं भार्ये यथेष्ट तर्पावें ११
मज जोडुनि देशिल जें देयिन पण्यांगनासि मी वित्त

---
१ शोधाला

माझें तुझेंहि होइल विषय-स्मरें तुष्ट सर्वदा चित्त १२
ती स्त्री म्हणे अवश्य व्यभिचारीं मग शिरे द्रविणजोडी
थोडी पहिली होती बहु वाटे विषय सेवितां गोडी १३
स्त्री-दत्त-धनें गणिका- भोगें स्वप्नांतही न घामेला
आनन करूनि काळें जोडुनि तोही अशा अघा मेला १४
पतिमागें पुत्रयुता ती स्त्री होती तसीच निजगेहीं
गेली गोकर्णातें होतां तारुण्यभर उणा देहीं १५
विधियोगें क्षेत्रातें पावे ती बंधु-जनयुता असती
तीर्थस्नान करुनियां झाली श्रीशंकरालयीं बसती १६
एक ब्राम्हण पौराणिक सांगत होता महा-पुराण-कथा
ती पूर्व-जन्म-सुकृतें आली तीच्या नवीच कर्णपथा १७
यमकिंकर असतीच्या घालिति योनींत परिघ तापविला
पाप-विलासांचा परि-पाक सुदुःसह गमेल हा पविला १८
ऐसें ऐकुनि झाला प्राप्त बहुभयेंकरून कांप तिला
चित्तांत म्हणे हा मी भजलें जारा त्यजूनि कां पतिला १९
एकांतीं शरण तया धर्मज्ञा जाय ती धरी पाय
प्रायश्चित्त विचारी अनुतप्ता अघ कथी म्हणे हाय २०
तो साधु म्हणे भद्रे प्राशावें पूत शंभु-यश कानीं
श्रीशिवनामाग्निपुढें न टिकावें पळहि-पाप- मशकानीं २१
श्रीशंभु-कथा श्रवणें ज्ञान ध्यानहि स्मरवेंचि लाधेल
कथिलें याहुनि शतगुण अधिक असो दुरित तुज न बाधेल
झाला पश्चात्ताप प्रायश्चित्तांत मुख्य हा होय
यापरि पवित्र न करी पापिजना देवसिंधुचें तोय २३
संतत सज्जन-सेवन सत्क्षेत्र- निवास सत्कथा- श्रवण
यांहीं मुक्त प्राणी पश्चात्तापी न जाहला कवण २४

---

१ बज्याला. २ खेदार्थी अव्यय.

शिव-पादाब्ज-ध्यानें जन्में एकेंचि होतसे मुक्ती
श्री-शंभु-कथा-श्रवणें नरसी तूं सत्य सत्य हे उक्ती २५
करितां उपदेश असा त्या सद्गुरुचे मनीं धरी चरण
त्या गोकर्णींचि वसे एके स्क कथा करी शिव-स्मरण २६
देहीं रुद्राक्ष धरी भस्मोद्धूलन करी कथा-श्रवण
तीर्थ-स्नान मिताशन चिंतीं शिवें-ध्यान-सत्पथ-प्रवण २७
आधीं वैराग्य-कथा तो सद्गुरु तीस नित्य आयकवी
मग भक्ति-कथा सांगुनि रोमांचित करि तदीय काय कवी
स्क-कथा-श्रवणें होतां मन निर्मळ तीस जाहलें ज्ञान
ध्यान श्रीकंठाचें ठसलें द्यायासि मुक्तिचें दान २९
दृढ पद्मासन घालुनि हृदयीं आणूनि सांबमूर्ति सती
प्रेमें पूजि प्रार्थी साधाया भक्ति-काम-पूर्तिस ती ३०
करुणेच्या अंभोदा शंभो दासाऽमर-द्रुमा बा हे
आहे दासी सक्ता पायांपासीं प्रभो मला वाहे ३१
नमितां नलोटिला त्वां पायें कोणीहि रंक रागानें
झळली नव-स्त्यद्राच्या हेच न कधि कोटि शंकरा गानें.
भक्तें समर्पिलें तुज रत्न मुकुट तेविं शंकरा बेल
भक्तिमुळें दास-गृहीं सिद्ध्यष्टक नें विशंक राबेल ३३
श्रीसांबा नित्य तुझा [illegible]ठायीं कृपा-कटाक्ष असो
कमळीं मधुप-कुल नसें त्वच्चरण-युगीं मदीय चित्त वसो ३४
ऐसें महेश्वरातें कर जोडुनि भक्तिनें सदा विनवी
शिव-सागरीं नदी ती होय न उपमा बुधे वदावि नवी ३५
असतीहि गुरुदयेनें शिवभजनें कर्मबंध ती सोडी
जोडी शंभु-ध्यानीं मानस वपु जीर्णवस्त्रसें सोडी ३६
स्पर्शुनि शिवदूतांहीं दिव्याकृति तत्क्षणींच ती केली

---

१ शिवध्यानरूपजोउत्तममार्गत्यालानम्र. २ देह.

नेली श्रीशिवलोकीं दिव्य-विमानीं बसोनियां गेली ३७
पाहे जगदीशातें तद्वामांकीं तयाहि देवीतें
परमाऽमृत मूर्त नयन-युग्में भाग्येंकरूनि सेवी तें ३८
कोटि-दिनकर-द्युति शिव विद्युत्-पुंजप्रभा शिवा देवी
पाहुनि भाग्यें त्यांच्या चरणावरि शिर पुनःपुन्हा ठेवी ३९
जाच्या ध्यानें स्मरणें नीर्नीही ताप संयती ती तें
पद-युग्म नमी प्रेमें कुरवाळिति आद्य दंपती तीनें ४०
सांत्विनि तितें शिवशिवा जैसे चिरदृष्ट पितर तनयेतें
परि तें प्रेम बहुत जरि असति अपत्यें असें तरि नयेतें ४१
पहिली होती असती सेवुनियां शंभु सत्कथा-रस ती
शिव मंदिरांत वसती पाहुनि सानंद जाहली असती ४२
श्री-शंभु-प्रासादीं एका समयीं स्मरोनियां पतितें
प्रार्थुनि जगदंबेतें पुसती झाली तयाचिया गतितें ४३
श्रीजगदंबा देवी ज्ञानें प्रत्यक्ष सर्व जी पाहे
सांगे पिशाच होउनि तव भर्ता विंध्यपर्वतीं आहे ४४
नमुनी म्हणे शरण तुज विधिचें घ्यायासि पद महासदये
तो सुगतितें उपायें कवणें पावेल वद महासदये ४५
जी अनिसद्यां वाटी स्वकरें भक्ता जना सुपायस ती
सांगे सर्वोपास्या शरणागत-वत्सला उपाय सती ४६
वत्से जरि तव पति तो पुण्या अस्मत्कथा श्रवण करिल
तरि लब्धशुद्धि होउनि या शिवलोकीं सुखस्थिती वरिल ४
पुनरपि नमन करुनि ती बहु विनवी स्वपतिचें अघ सराया
पावुनि उच्च-पद-स्थिति तेथून पुन्हा कधीं न घसराया ४
या बद्धांजलिवरि ती द्रवली देवी दया-सुधा-सरिता
अबुधाहि जिच्या नावें होय भवार्णव जसा बुधास रिता

---

१ उत्सवा. + जारिणी.

आज्ञापि स्वमुखें जो गंधर्वाधिपति तुंबर त्यातें
गुण गा त्यातें भेटें जा जैसी गाय हुंबरत ज्यातें ५०
या स्त्रीतें दूता तूं घेउनि जा विंध्यपर्वतीं तूर्ण
अघनग ईच्छ्या पतिचा अस्मत्कीर्त्यशनिनें करीं चूर्ण ५१
अस्मत्कथा पिशाच श्रवण करी तो असें करीं त्वरित
स्वस्थ करावा आर्ते येथें अगदें बळें जसा ज्वरित ५२
जरिहि करिल ऐकाया पुण्या अस्मत्कथा पिसाचार
ऐकिव बळेंचि कथिती कवि नवळे जड तथापि साचार ५३
करिळचि नो ऐकवितां पुण्या अस्मत्कथा पिहित कान
शिशु नायके करावें तन्मातेनें तथापि हित कां न ५४
अस्मत्-पूत-कथानीं पातक-पादप समूळ खाणावा
आणावा शिवसन्निध हा आवश्यक निदेश जाणावा ५५
ऐसी आज्ञा होतां जीतें नभजोंनि सर्व तापावे
तीतें वंदुनि तुंबर स्वविमानें विंध्यपर्वता पावे ५६
त्या स्त्रीसह येउनि तो तुंबर विंध्याचळांत तो पाहे
आहे पिशाच भीषण कोणी ज्याच्या न दर्शना साहे ५७
प्रभुचे दूत प्रेरुनि परमोग्र पिशाच तो धरविला हो
पापें प्रभु-प्रतापा तरि तिमिरें प्राप्त रोध रविला हो ५८
करकरुनि बांधिला तो शिवदूतानीं महापिशाच बळें
घटिका न भरों देतां जा लंघाव्या दहा दिशा चपळें ५९
निश्चळ करुनि बसविला तो भूत बळेंचि आयकायास
शिवदूतायास तसा होय जसा अगददायकायास ६०
तो आसनीं बसविला पाप हर्यी जेविं रडत राऊत
श्रीशिवकारुण्याचा म्हणतो रे सर्वजड तश ऊत ६१

---

१ अस्मत्- कीर्ति- अशनि- आमच्या कीर्तिवज्रानें. २ औषधें. ३ औषध देणाऱ्याचा श्रम.

यश गायासि शिवाज्ञा बसवी तेशापुढें हि तुंबर ते
जे प्रेमभरीं भरले असते म्हणतेचि गाय तुंबरते ६२
जरि बद्ध हस्त नसते तो कां कानीं न घालिता बोटें
खोटें पिशाचपण जरि भगवत्कारुण्य सर्वथा मोटें ६३
करितां विघ्न श्रवणीं लाजविता वारिदासि हाकानीं
न पडों देता तुंबर-शब्द अघार्णव पिशाच हा कानीं ६४
यास्तव वाटे त्याच्या वदनीं दृडपूनि घातला गोळा
भोळा शिव परि तज्जन करितो बळ सर्व कुमतिचें गोळा
सांबशिवातें वंदुनि मग तुंबरु वल्लकी[1] करीं धरुनी
गाय कथा गाव्या ज्या परमोदारा सुरांचिया तरुनी ६६
होता गान शिवकथा सुस्वर सुप्रेम तो दिवस सप्त
झाला शांत पिशाच क्रूरमति जसा सुधाघनें तृप्त ६७
परम-पवित्र-शिव-कथा-श्रवणें गेलें समस्तही पाप
तापप्रशमें डोले तो गीतें जेविं डोलतो साप ६८
पैशाच वपु त्यागुनि सहसा दिव्य स्वरूप तो पावे
लोपावे यत्तेजें होउनि परिभूत देव कोपावे ६९
दिव्य पुरुष तो प्रेमें आपणही मधुर गावया लागे
वागे रागकुल मनीं सात्विक भावहि तदागमें जागे ७०
वंदी तो तुंबरुतें शिवदूतांतें तयाहि आर्येतें
वर्णुनि सावित्रीतें स्मरलों ऐसें म्हणे स्वभार्येतें ७१
मग तो चढुनि विमानीं तुंबरु-शिवदूत-निज-वधूसहित
शिवलोकातें गेला केला भगवद्धरीं[2] महामहित ७२
पीत्या ताप तसाचि त्रिदशेंद्रा अमृत सेर-सदा शिवतो
शुद्ध कथारस होतो प्राप्त जया भजति सुर सदाशिव तो ७३
सस्यातें[3] वृष्टि जसी ज्ञानातें शंभूची कथा पिकवी

1 वीणा. 2 देवसभेला. 3 धान्यातें.

रुचि रुचि अतुलाचि इची कीं सेविति मुक्त जरि तथापि कवी ७४
श्रीशिवकथा यथामति लिहिली हे रामनंदनें बाळें
भाळें ईस असें मज केलें गुरु-पद्-रजःप्लुतें भाळें ७५
साधु सदाशिव-वदनें आज्ञा ज्या ईश्वरें मला केली
त्या लिहुनि वाहिला हा शिव-कीर्ति-ग्रंथ हृद्व्यथा गेली ७६
ग्रहण करी प्रभु जरिही ग्रंथ प्राकृत असाधु तरि याचें
स्वीकारी तें भक्तें कुसुम समर्पित जसें धुतरियाचें ७७
शिव-कीर्ति-ग्रंथ ललित रचिला भावें करूनि आर्यांहीं
करुणा करुनि सकृत् तरि वाचावा हा समूळ आर्यांहीं ७८
हरि-हर-भक्त रसिक जे त्यांच्या म्हणिजेल गोड कानांहीं
थोडा अंकें अर्थें शिव कीर्तिग्रंथ थोडका नाहीं ७९
विनवितसें साधूतें अणिकहि देवूनि हाक विनवीन
कीं आम्ही शुचि होवूं सद्यश सेवूनि हा कवि नवीन ८०
सज्जन म्हणति कलीतें श्रीहरि-हर-चरित-कीर्तन-श्रवण
परम प्रशस्त मग हें नकरील मुमुक्षु तापला कवण ८१
मंत्र श्रीशिव जय शिव जयजय शिव हा मनीं सुखी राहे
आमरण ग्रंथ-रसिक शिवचरणीं रत मयूर हा वाहे ८२




१ आर्याछंदांहीं. २ श्रेष्ठांहीं. ३ चिन्हें (अर्थें याशब्दाचें विशेषण.)

सं

# मोरोपंतकृत.

सप्तशती

# आर्या

---

रा. रा. परशुराम बल्लाळ गोडबोले

यांच्या सहाय्यानें

शुद्ध करून

## माधवचंद्रोबा

यांनीं

लोककल्याणार्थ

स्वताच्या

शिलाछापखान्यांत छापिल्या.

मुंबई.

शाके १७८५

सन १८६४

# मोरोपंतकृतसप्तशतीआर्या

## प्रथमचरित.

श्रीमान् चैत्रकुलोद्भव सुरथ स्वारोचिषांतरीं होता
तो सार्वभौम पोषी आलयशा हंसखग जसा पोता १

औरसपुत्रासि जसा तात तसा तो प्रजांसि परिपाळी
दैवें घावी लागे कुदशेची त्या तशाहि परि पाळी २

रिपु कोलाविध्वंसी ते होउनि हीनबळहि एकवट
भंगिति पर-सैन्यार्णव वाटे तद्देश त्यांत एक वट ३

आक्रमिला त्या अरिनीं जेथें तो सुरथ वेढिलें पुर तें
क्रूरत्व प्रकट असें केलें दैवें तया नृपीं पुरतें ४

दुर्बळ होतां फिरतां विधि हरिलें कोशबळ अमात्यांहीं
पति-कुदशा दुष्टांहीं जे तस्कर इच्छिजे अमा त्यांहीं ५

स्वामित्व सेवकांहीं हरितां अश्वीं चढोनि एकाकी
मृगया-मिषें निघे कीं श्री हंसी स्पष्ट होय ते काकी ६

नृप आश्रमासि गेला जेथ वसे मूर्त योग मेधा त्या
ज्ञान-तपःसामर्थ्यें करुनि स्वसमान जो गमे धात्या ७

मेधा बहु सत्कारी गहनवनीं आश्रमीं वसे सोधी
जरि तो सुरथ श्रीमुनि- चरणश्रित-कल्पतरुतसे सोधी ८

त्या आश्रमीं फिरे तो चित्तीं चिंता करी म्हणे हाय
नकळे सत्पूर्वज-परि- पाळित-पुर-गति असे करीकाय ९

दुर्हृत भृत्य माझे पावावे स्वास्थ्य काय मन्नगरें
झालें मजही राज्य त्याज्य खलजनें जसेंच अन्न गरें १०

सगुण सदामद माझा हस्ती जो मुख्य संगर-सहाय
कैसा असेल नकळे मज त्याचा म्हणवि सगौरस हाय ११

मत्साचिव करित असतिल अनुवृत्ति मदीय-शत्रु-भूपाची
हाय कसी आवडली सेवा मानस-खगांसि कूपाची १२

कोश क्षय पावेलचि जो अतिकष्टें जपोनि सांचविला
म्यां आपणासि समयीं कार्या येइल म्हणोनि वांचविला १३

नित्य बहु व्यय करितिल त्यांचें ठावें असे जना शील

---

१ नामविशेष (राजा), २ स्वारोचिषमन्वंतरीं, ३ बालकास, ४ वांटा, ५ नामविशेषशत्रु, ६ अमावास्या, ७ कावळीण, ८ नामविशेष (ऋषि), ९ ब्रह्मदेवास, १० चिंताक्रांत, ११ मिळुनी, १२ मे... [illegible]

सम्यक् व्ययस्वभाव न जो तो निधि नवहि कां न नाशील १४
ममताकृष्ट-मति नृपति चिंता नानाविधा असी वाहे
तों एका वैश्यातें भ्रमतां त्या आश्रमींच तो पाहे १५
त्यासि पुसे तो नृप तूं कोण दिससि दुर्मना सशोक मला
येथें कां आलासि स्व-जन-गृह-वियोग कोर्य कां गमला १६
वैश्य म्हणे धनिक-कुलज मी वैश्य असें समाधि या नावें
आलों वनासि दुःखें ससुखें काय स्वदैन्य सांगावें १७
सर्वस्व हरुनि मजला स्त्रीपुत्रांहीं वनासि पाठविलें
केलें ज्यां परिपालन जें कांहीं तें तिहीं न आठविलें १८
स्त्री-पुत्र-स्वजनांची कुशलाऽकुशल प्रवृत्ति मी नेणें
या आश्रमासि बापा अतिदुःखित जाहलों असें तेणें १९
भूप म्हणें केलें ज्या लुब्धांहीं त्यजुनि धर्म अत्याग
त्यांच्याही स्नेहाचा कां रुचला त्वन्मनासि अत्याग २०
काय करूं हृदय नव्हे निष्ठुर येतें म्हणे समाधि रडें
जरि लाजे खड्गाक्-शर- विद्धा या चालनीसमा धिरडें २१
मज गांजिलें निजांनीं अरिनीं भंगोनि जेविं गांजावें
नकळे प्रेम सुत-स्त्री- स्वजनातें त्यजुनि हें न कां जावें २२
ऐसें बहु वैश्य वदे त्या समदुःखासह स्वयें राजा
जाउनि मेध्यासि नमी प्रणतांच्या सिद्ध जो सदा काजा २३
भूप म्हणे गुरुजी जें कांहीं पुसतों द्रवोनि सांगा तें
गेलें राज्य तरिहि मन माझें माझें म्हणोनि कां गातें २४
युक्तचि अज्ञानाचें विषयीं असतें सदैव हें वाजें
जाणें मी दोष तरिहि गत-राज्य-पदीं ममत्व कां माजें २५
सुत-दारांनीं लुटिला नच्चिंताकुळ सदा परि समाधी
हा वैश्यहि मीहि पहा आम्हीं दोघे महीवरि समाधी २६
ज्ञान्यासहि मोह असा कां आहे काय हें वदा स्वामी
आम्ही दोघे आलों शरण पुरे अर्थ-काम या धामीं २७
मेधा मुनि-राज म्हणे देवी श्रीविष्णुची महा-माया
वा या संसाराची स्थिति-कर्त्री तत्प्रभाव हा राया २८
ज्ञान्याचेंही ओढुनि करि मोहाच्या अधीन हें मन गा

१ खर्चकरणारापुरुष, २ दुःखग्रस्त, ३ कराव्यासयोग्य, ४ वागणूक, ५ अति-भाग-महाअपराध, ६ नटाकणे, ७ पक्वान्नविशेष, ८ वैश्य, ९ सम-आधि-समदुःखी,

उडविल चाळविल नृपा त्याहि चलन ज्या कधीं न हेमनँगा २९
हे विश्व-हेतु देवी जगदंबा बंध-हेतु हेचि नृपा
जीवांतें मुक्त करी जी विद्या काय ती इचीच कृपा ३०
सुरथ म्हणे मुनिनाथा जीतें म्हणतोसि तूं महामाया
झाली उत्पन्न कसी कर्म तिचें काय सांग हें वा या ३१
मेधा म्हणे कराया देवांची सर्व-कामना-पूर्ती
प्रकटे तेंचि उपजणें परि वा नित्याचि ती जगन्मूर्ती ३२
एकार्णव करुनि अखिल जग जगदीश्वर फणींद्र-तनुतल्पीं
भजला स्व-योग-निद्रे- प्रति पति सकळाहि शक्तिचा कल्पीं ३३
प्रभु-कर्ण-मळापासुनि मधु कैटभ असुर जन्मले दोघे
ते खाया येती तें भय भगवन्नाभिपद्मभव तो घे ३४
असुर स्ववधोद्यत निज- जनक प्रभुहि प्रसुप्त पाहोनी
चतुरास्य योग-निद्रा- स्तुति करि नाभ्यंबुजींच राहोनी ३५
द्रुहिण म्हणे परमेश्वरि तूं स्वाहा तूं स्वधा सुधा शांती
श्री सावित्री सृष्टि- स्थिति-संहृति-तुष्टि-पुष्टि-धी-क्षांती ३६
सृष्टिस्थितिलयकर ही केले निद्रेसि वश तुवां व्यक्त
सर्वेश्वरेश्वरि तुतें आहे कोण स्तवावया शक्त ३७
हरि हर विधि ऐशांही कोणाहि तुझी न वर्णवे लीला
त्रिभुवन अवलंबुनि तुज जेसें फल पुष्प पर्ण वेलीला ३८
भगवति करुनि दया त्वां मधु कैटभ असुर शीघ्र मोहावे
म्हणसि जसी तूं न म्हणे सुरपी इष्टार्थ सर्व दोहावे ३९
महद्धकाम असुर हे मधु कैटभ खळ करावया चूर्ण
प्रभुला प्रबोध द्यावा त्वां जगदीश्वरि दयानिधे तूर्ण ४०
ऐसी स्तविली भावें पद्मभवें हस्तपद्म जोडूनी
देवी निघे प्रभूत्तम- नेत्रमुखादि-स्थळांसि सोडूनी ४१
प्रकटे यापरि दर्शन दे ये कार्या परास्त धात्यातें
होऊं नदेचि झाली देवी आर्या परा सुधा त्यातें ४२
प्रकटुनि म्हणे भगवती हूं विधिस त्यजुनि असुर-भा जागे
त्या वत्सा तों चिंता जों निजली माय न सुरभी जागे ४३
श्रुति गुरु म्हणति जयातें न कळे जडजीव हो परि सजा गा

१ मेरुपर्वतास, २ मला, ३ प्रलयकालीं, ४ ब्रम्हदेव, ५ मृत, ६ ब्रम्हदेवातें,

करुणार्णव दासहृदय- लोहाचा होय तो परिस जागा ४४
मत्त प्रभुतें देखति ते कां भिडतील मग न वोढूनीं
बाहूंनीं रण करिती भरिती क्रोधांध गगन बाहूंनीं ४५
उत्साह नव्हे चिउणा न म्हणे कोणीहि हाय नवदेहें
श्रीमुनि युद्ध प्रभुसीं तें पंचसहस्त्र-हायन वदे हें ४६
यस्य दरजासि लाजति चिंतामणि कामधेनु परे माग
त्या मायामोहित ते म्हणती झालोंच तुष्ट वर माग ४७
भगवान् म्हणे असुर हो देतां होउनि सुतुष्ट आजि वर
व्हा वध्य काय अन्यें वरिला त्यां इष्ट हानि आजिवर ४८
तें वंचित असुर म्हणति जेथें उदकें परिप्लुता न मही
तेथें आम्हांसि वधीं हो विजयी तूंचि सत्पराक्रमही ४९
ऐसे असुर ठकविले घालिति त्या ईश्वरेश्वरा कोडें
इतरांसि समुद्र परी प्रभुला गोष्पद तसेंचि तें थोडें ५०
केलें हरिनें अरिनें ते तोडुनि मस्तकांसि असु-रहित
न सुरहि तद्गतिभाजन केले वंचुनिहि फार असुर-हित ५१
ब्रह्म्यानें संस्तविली ती पूर्वी प्रकटली आसी देवी
परिस प्रभाव आणिकहि अमृतरसा तेविं रसिक या सेवी ५२
यावरि महिषासुरवध मग शुंभ-निशुंभ-वधहि आयकवी
ती वर्णाश्वी भेटे नकरिल निश्चय करूनि काय कवी ५३
गत राज्य सुरथ पावे होय मनुहि तदभिधान सावर्णी
जगदीश्वरि प्रभाव श्रीमार्कंडेय मुनि असा वर्णी ५४
होय समाधिहि युक्त श्रीजगदंबेसि भजुनि सुज्ञानें
व्हावें कृतकृत्य श्री- हरिमायेतेंहि त्यजुनि सुज्ञानें ५५
प्रथम-चरित्र मयूरें लिहिलें हें किमपि सुरसिकां गाया
अमृतप्राशनकामा सकरुण कवि म्हणति झुरसिकां गा या ५६
माया तुझी मुकुंदा पावो तच्चरित वर्णिलें तुजतें
सृजतें तुजमाजी स्थिति करितें तैसेंचि शेवटीं वुजतें ५७

प्रथमचरित समाप्त.

---

१ बोलावूनि, २ हुंकारांनीं, ३ मार्कंडेय, ४ नूतनदेहें, ५ कल्पतरु ६ प्राणरहित, ७ देवांचेंहित, ८ स्तोत्रानें, + भुजांहीं, + पांचहजारवर्षे, ∗ भिजलेली

# मोरोपंतकृतसप्तशतीआर्या.

श्रीमद्विष्णुप्रभुची नमिली वरदा असी महामाया
ब्रम्हांऽड-शतांत जिचा योग्य न महिमा असीम हा माया १
देवांचा शक्रअधिप असुरांचा महिष करिति हे कलहा
शत-वर्षांऽतीं पावुनि परिभव शतमन्युचें म्हणे बल हो २
झाला इंद्र स्व-बळें समरीं पावोनि सैरिभ यशातें
शक्र-प्रमुख-सुरांचीं विलया ने उग्र वैरि-भय शांतें ३
सुर कथिति दुःख विधितें तो त्यांसह जाय हरि-हरां-जवळ
यच्चरणांहीं केला शरणागतजनविपत्तिचा कवळ ४
ते कथिति इंद्र झाला महिष हरुनियां सुराऽधिकारा हो
प्रभुजी असुरीं न श्री बहु-मोहकरी सुराऽधिका राहो ५
लोक-त्रय-पति झाला बहु भोग महिष तो कृपाळाचा
विधिच्याहि करितसे अधि- कार न शक्रादि-लोकपाळाचा ६
आलों शरण तुम्हां कीं भवदितर न यश उपाय चिंतुनि घे
तुमच्याचि दयेनें नत- हृदयींचा क्षिप्र सर्व किंतु निघे ७
सुरदीनोक्तश्रवणें हरि-हर-हृदयांत कोप ये राजा
प्रभु साहतिल कशा श्रित- जन-कुदशा सोसती न येश ज्या ८
प्रभुवर-हरि-हर-वदनें झालीं सुर-परिभवें भृकुटि-कुटिलें
कीं महिष-तस्करें यश सर्वस्व हरुनि बळें स्व-बळ लुटिलें ९
प्रकुपित हरि-हर-शतधृति जे या सुरनायकाननांतून

१ हाय, २ महिषासुर, ३ सुखें. ४ यत्-चरण-ज्यांच्यापायांनीं, ५ देवाचा, ६ भवत्-इतर- तुमच्याहूनइतर, ७ नम्रझालेल्यांच्याहृदयांतील, ८ दुःख, कांक्षा, ९ सुर-दीन-उक्त-श्रवण- देवांच्यादीनभाषणाच्याऐकण्यानें, १० क्रोधानें वांकड्याभोंवयाज्यांच्याठायीं अशीं, ११ विष्णु, महादेव आणिब्रम्हदेव, १२ सुर-नायक-आनन-देवांच्यानायकांच्यामुखांतून, + भावण्यास.

सुमहा-तेज निघालें दहनाचें काय काननातून १०
शक्रादिसुरांच्याही देहांतुनि दिव्य तेज बाहेर
तेसेंचि निघे जें शुचि- कीर्तिचें भाग्यवंत माहेर ११
तें एकवटे त्याची होय हराया सुराऽरि-मद नारी
तीतें पाहुनि जयजय वदले विधि-विष्णु-वृत्र-मदनाऽरी १२
तीचें मुख हर-तेजें यम-तेजें केश मस्तकीं झाले
हरि-तेजें भुज ज्यांच्या सज्जन सेवुनि यशोमृता धाले १३
स्तन-युग्म सोम-तेजें मध्यहि ऐंद्रें करूनियां होय
तत्तेजें जंघोरू ज्याँच्या स्वाधीन सर्वही तोय १४
गुरु-तर नितंब भौमें ब्रम्ह्याच्या दिव्य चरण तेजानें
तें सौर शोभति करुनि रक्तांऽगुलि-दशक चरण ते ज्यानें १५
हस्तांऽगुलि वसु-तेजें जी सम अवयव न आन नासा जे
झाली कुबेर-तेजें ते बहु शोभवुनि आनना साजे १६
प्राजापत्यें[10] झाले रुचिनें[11] लाजविति अमृत-रस दंत
पावक-तेजें नयन- त्रय होय करावयासि असदंत[12] १७
भ्रूयुग संध्या-तेजें मारुत-तेजें करूनि कर्ण न हो
जे म्हणति भित-दुःख- श्रवण सदा तत्सत्कीर्तिवर्णन[13] हो १८
यापरि पावे तेजें अन्यसुरांच्याहि संभवा राया
जीचें क्षम[14] यश पंकां गंगेचें जेविं अंभ[15] वाराया १९
जें धरित्र्यांच्या[16] अरिला न स्वप्नामाजिही शिवें[17] शिवे तें

१ वृत्रासुर आणि मदन यांचे शत्रु इंद्र महादेव, २ यश-अमृत-कीर्तिरूप अमृताला, ३ इंद्राच्या तेजें करून, ४ जंघा-उरु-जांगा आणि मांड्या, ५ पृथ्वीच्या तेजानें, ६ सूर्याचें, ७ अन्य, ८ नासिका, ९ मुखवास, १० ब्रम्हदेवाच्या तेजानें, ११ कांतीनें, १२ असत्-अंत-दुष्टांचा नाश, १३ तत्-सुकीर्ति-वर्णन-त्यांच्या उत्तम कीर्तीचें वर्णन, १४ समर्थ, १५ जल, १६ धारण करणाऱ्यांच्या, १७ कल्याण, १८ स्पर्शकरी, + ज्यावरूणाच्या, ** अतिशय मोठा, †† कमरेच्या पाठिमागचा भाग (ज्याला माज असें म्हणतात तो) ** पातका आणि मळास.

निज-शूल-प्रभव विजय- मूल अतुल शूल दे शिव शिवेतें[*] २०
प्राण-व्यसनीं जेणें गज-वर रक्षूनि निवटिला नक्र
त्या निज-चक्रापासुनि निर्मुनियां चक्रपाणि दे चक्र २१
त्या भगवतीस भावें गो-क्षीर-धवल जलेश दरवर दे
प्रार्थुनि म्हणे अरीचा बाधों पावा न लेश वैर चरदे २२
दहनहि दे शक्ति तिला जी तेजें करुनि लाज दे वीजे
देविन म्हणे तुझे ते वांछीत पदार्थ आज देवी जे २३
दे दिव्य चाप मारुत शर-पूर्ण तसेच देव तो भाते
स्वीकारितां शिवेनें बहु धाले पावलेचि शोभा ते २४
प्रतिपक्ष करिघटेला ज्याच्या दूरूनि भावि वास वदे
त्या स्वगजाची घंटा निजवज्रोत्पन्न वज्र वासव दे २५
यमधर्म काळदंडा- पासूनि दे दंड वरुण पाशातें
जे आपणासि दुर्जय दुर्जन त्या सर्व-शत्रु-नाशातें २६
माळा प्रजापतीही दे त्या जगदंबिकेसि अक्षांची
ब्रम्हाऽर्पित स्रु-कमंडलु घे राज्ञी दुष्ट-दमन-दक्षांची २७
निजकिरणांतें स्थापी भानु तिच्या सर्व-रोम-कूपांत
दे खड्ग चर्म काळ क्षय व्हाया देव-शत्रु-भूपांत २८
क्षीरोदधि दे अजरें वस्त्रें तेसांचि अमल हार तिला
म्हणवी रुचिनें जिंकुनि बहु जीचें वदन-कमल हा रतिला २९
जो देव विश्वकर्मा त्या चतुरें दिव्य-वस्तुच्या घटकें
दिधलीं चूडामणिसह स्रु-मणि-कनक-खचित-कुंडलें कटकें ३०
धवलार्धचंद्र कंठा-[१०] भरण चरण-बाहुभूषणें दे हीं

१ महादेव, २ वरुण, ३ शंखश्रेष्ठ, ४ भय, ५ बर्ची, ६ शत्रु, ७ निज-वज्र-उत्पन्न- आपल्यावज्रापासूनउत्पन्न, ८ रुद्राक्षांची, ९ जीर्णनव्हे तअसीं (नवीं) १० कंठ- आभरण- चंद्रहार, ११ विश्वकर्मा, + गजसमुदायास, * भवानीतें, ## मलरहित (शुद्ध)

मणिमुद्रिकाहि आनख- शिख भावें करुनि भूषवी देहा ३१
विमल परशु विविधाऽस्त्रें तेसेंचि कवच अभेद्य देवीतें
जीचें कृपा-निरीक्षण अत्यद्भुत-सर्व-संपदे वीतें ३२
अम्लान-पद्म-माळा दे सिंधु उरीं शिरीं धरायास
जो आपणासि दुस्तर- जाड्यांभोधींत उद्धरायास ३३
रत्नें देउनि दिधला मृगेराज बसावया हिमे-नगानें
जाया जाड्य यशांच्या चरणींच बसावयाहि मन गानें ३४
दे पानपात्र धनेपति वीर्योत्साहें वधावया अरितें
न रितें व्हावें तिळहि प्राशन केलें क्षणक्षणीं तरि तें ३५
अर्पी परमप्रेमें पूजुनि सविशेष नागहार तितें
भूभाराऽसुर-शमनें मागे कवि शेषनाग हा रतितें ३६
अन्य-त्रिदशांनींही सर्व-स्व-विभूषणायुधांनीं ती
सन्मानिली बहुमता जैशी प्राणाऽधिका बुधां नीती ३७
मग साऽट्टहास वारं- वार शिवा गर्जना करी राजा
ज्या क्षिति वर्णांच्या त्या बहु कांपविती विराट्-शरीराज्या ३८
त्या सिंहवाहिनीतें जय ऐसें सर्व देवता म्हणती
स्तविती मुनि-वर करिती बहु भक्ति-विनम्र होउनि प्रणती ३९
ऐकोनि आः किमेतत् कुपित खळ म्हणे स-सैन्य तो धांवे
आले सर्व नळगती दीप-द्युतिला पतंग शोधावे ४०
महिषाऽसुरें भगवती धाउनि येऊनि देखिली हो ती
सुर-विमर्द-चित्रकारें जी गगन-पटांत रेखिली होती ४१
जीनें श्री-चरणांहीं करितां आक्रमण भूमिका लवली

---

१ प्रसवतें, २ सिंह, ३ हिमाचलानें, ४ कीर्तीच्या, ५ कुबेर, ६ पानपात्र, ७ सुरवातें किंवा प्रीतीतें, ८ क्रोधार्थी अव्यय, ९ किं-एतत्- काय हें असें, १० देवांचें ऐश्वर्य हाच चित्र तारीत्यानें, ११ लिहिली, + नखांपासून केशापर्यंत, ☩ तरण्यास कठीण अशा जडत्वरूप समुद्रांत.

गगनीं जिच्या किरीटें सग्रह-नक्षत्रराजि कालवली ४२
जीच्या बाहु-सहस्रें व्यापुनि दिक्-चक्र सर्व शोभविलें
क्षोभविलें चाप-रवें कांऽड यशें देव-वृंद लोभविलें ४३
मग त्या श्री-दुर्गेशीं असुर-भटांशीं प्रवर्तलें युद्ध
होय दिगंतर शस्त्राऽस्त्र-विदीपित ज्यांत तें असें शुद्ध ४४
महिषासुर-सेनानी चिक्षुर-नामा महाऽसुर तसाच
चामर चतुरंग-बळें- युक्त रण-मखीं महासु रत साच ४५
तेसाच ईश्वरीशीं षडयुतरथयुत उदग्र युद्ध करी
परि तो आला व्हाया देवी-शर-निकर-सिंह-रुद्ध करी ४६
असुर महाहनुहि करी समर रथाऽयुत-सहस्र आणून
असिलोमा रथ पंचा- शन्नियुत-युत स्व-विजय जाणून ४७
बाष्कळहि निज-जयाची श्रवण करित बंदि-गण-मुखें गाणीं
रथ एक कोटि-षट्शत- अयुतें गज हय असेचि बहु आणी ४८
पंचाशत्-कोटि-मित- स्यंदन-परिवृत सुराऽरि मत्त महा
वीर बिडाललाख्य करी दुर्गेशीं युद्ध असुर सत्यमहा ४९
रथ-गज-हय-परिवृत सुर- रिपु अन्यहि अयुतसंख्य जे क्रूर
ते चंड-मुंड-शोणित- बीजादिक करिति रण महाशूर ५०
तुरग परार्ध परार्ध स्यंदन गजही परार्ध यापरि ते
निजबळ आणी समरीं पाडाया तो लुलाय पाप रितें ५१
करिते झाले सोडुनि शस्त्राऽस्त्रें स्वैर असुर समरा या
सजुनि भजन-सुरस कुमति ते प्याले वैर-असुरस मराया ५२
तोमर मुद्गर मुसल प्रास परशु पट्टिशाऽसि शार शक्ति

१ ग्रह आणि नक्षत्रें यांची पंक्ति, २ ब्रम्हांड, ३ देवसमूह, ४ दैत्य, ५ देवीचा शरसमूह हाच सिंह त्यानें रुद्ध व्हाया, ६ हनि. ७ सत्यतेजजीचें असी (दुर्गेचें विशेषण), ८ महिषासुर, ९ कुबुद्धि, १० वैररूपविषरस, + शस्त्रें आणि अस्त्रें यांहीं प्रदीप्त पेटलेलें, (देदीप्यमान) + युद्ध, ⁑ षट्-अयुत-रथ-युत-सहा अयुतें जे रथ त्यांहीं, करून युक्त असा, ≠ महिषासुराचा सेनापति.

पर-शस्त्रें निज-शस्त्रें    खंडी लीलें करूनि पर-शक्ति ५३
तम रवि-रुचितें किंवा    सद्विद्येतें महाऽघ न शिवे तें
तैसें त्या असुरांचें    शस्त्र-पटल जितमहाघन शिवेतें ५४
तोंहि शिवा-वाहन हरि    बहु कोपे कंपवुनि सटा याला
साहे न दवा वनसें    सैन्य कसें संपवु निसटायाला ५५
जे सोडिले शिवेनें    संगर करितां सुगंध निश्वास
तेचि अमितगण झाले    रक्षाया असुर वधुनि विश्वास ५६
करितील पर-नग-शिरः    शिखरीं ते अशनि कां गण न टांचा
वाढवि हर्ष तयांचा    तें मेघुचें जेविं आगण नटांचा ५७
कितिएक युद्ध करिती    ते गण वाद्यें कितीक वाजविती
गाजविति ब्रम्हांऽड    ध्वांतहराच्या करांशि लाजविती ५८
परमेश्वरी विदारी    जो त्यजिना योध आयुधा त्यातें
तें काय तीपुढें जी    देणारी बोध आयु धात्यातें ५९
खड्गें करूनि तोडी    अरिस फळसमान वा धरसाधस ती
ज्यात्यास म्हणे चित्तीं    जा लोक सुखें अबाध साध सती ६०
शूलें चक्रें वज्रें    करि पर-मारण महा-गदा-घातें
विश्वाच्या वाराया    वरि परमा रण महागदाघातें ६१
असुर वधुनि रण-रंगीं    शोणित-तटिनी उदंड वाहविल्या
त्यांतें खळचमू त्यांतहि    नच कांहीं पाप-मतिहि राहविल्या ६२
लावी सतत शराची    द्यायास परी शरासना दानें
खळ किति निजघंटेच्या    मोहितिच पराशरास नादानें ६३
उगेवी महा-भय-तिमिर-    सागर-पर-पारदा दिना कैर्षी

---

१ जिंकिले मोठे मेघ ज्याणें असें, २ देवीतें, ३ सिंह, ४ मानेवरचे केंस, ५ राजाचें, ६ सूर्याच्या, ७ ब्रम्ह्यातें, ८ देवी, ९ शत्रुक्षय, १० महा-गद-अघ-महारोग रूपपातकातें, ११ रक्तनद्यांत, १२ खळचमूंतही, १३ शत्रूला, १४ धनुष्यास, १५ उसन्नकरी, १६ महत्‌भयरूपअंधकारसमुद्राच्यापैलतीरासपोंचविणाऱ्या, १७ ओटी.
+ शत्रुरूपपर्वतांच्यामस्तकरूपशिखरीं, + किरणास.

पाशें बांधोनि असुर बहु स्रवी नारदादि नाकर्षी ६४
पाडी टांसळुनि विशिखवर्षे ती घनघटा कितेकांतें
सँल्लंघन घातक जरि नसतें तरि अनघ टाकिते कां तें ६५
पाहति रणीं कराया त्या देवीशीं बराबरि कबंध
नाचति हर्षें जाणों म्हणती तुटला बरा वैरिक बंध ६६
बाळभय हरुनि ऐशी कोणीही हर्षली मसू नाहीं
त्या श्रीजगदंबेवरि सुरसंहति वर्षली मसूनांहीं ६७
क्षणमात्रें सर्व-महिष-सैन्य शिवा-गणसमूह हरि खरची
घन जेविं मयूर-मनीं देव-मनीं तो प्रताप हरिख रची ६८

---

# अध्याय-२

देवीवरि बळ-नाशें धांवे कोपोनि म्हणत चिक्षुर हा
जाणों करेणुसि म्हणे मंगाचा काम धरुनि इक्षु रहा १
मेरु-शिरीं तोयदसा देवीवरि तो महेषु-वृष्टि करी
सिंहीतें माराया वाटे झटतो मदांध-दृष्टि करी २
देवी ते शर तोडुनि सोडुनि निज-शत्रु-काय-हानि-कर
लीलेनेंचि अरिसि करि विरथ म्हणति देव काय हा निकर ३
हय-सारथि-चाप-ध्वज-नाशें अत्यंत पाप तो खवळे
अपराधें करीं जेसा घाया ओशीस साप तोरव बळे ४
तीव्रखें र्दैर चिक्षुर तो घेउनि खड्ग-चर्म नव धावे
देवी म्हणे असे म्यां न विलोकुनि शूरकर्म न वधावे ५

---

१ बाणवृष्टीनें, २ मेघसमूह, ३ देवसमुदाय, ४ फुलांनीं, ५ हर्ष, ६ नामविशेष (दैत्य), ७ हत्तिणीस, ८ ऊंस, ९ मेघसा, १० गज, ११ आपल्याशत्रूंच्या शरीराच्यानाशकरणारे, १२ अपराधकर्त्याचेठायीं, १३ दादेला, १४ वरच्या,
+ माता, + सत्-लंघन- साधूचेंलंघन, ** हा कोंकणी शब्द आहे. याचागर्भितार्थ मात्र असा निघतो.

आधीं करी हरि[1]-शिरीं तो समरीं चिक्षुर प्रहारातें[2]
जरिही त्याला होता यासमरींचि क्षरेम-हारातें ६
मग जो वर-तेजाचा लावण्याचाहि भव्य-भुज गाभा
खड्ग[4] करूनि हाणी चिक्षुर त्या परमभव्यभुजगाभा[3] ७
देवी-बाहु-स्पर्शें गेला तत्काळ उडुनि करवाल
तरुण रवि ज्यांत लोपे त्या तेजीं काय उडु-निकर[6] वाल[7] ८
सोसे न तिची त्याजसि काशीची नीचमद्रका लीला
क्षेपी शूल क्षोभें लक्षुनि तो रुद्र भद्रकालीला ९
अहिवरि गरुड तसा ती त्यावरि निज-शूल अंबिका धाडी
ताडी त्या शूलातें भस्म करूनि चिक्षुरासिही पाडी १०
महिष[9]-चमूपति मरतां त्रिदशार्दन[10] मत्तसिंधुरारूढ[11]
चामर-पामर टाकी शक्ति महाशक्तिवरि महामूढ ११
शक्ति पडे कीं तीचा मद हुंकारेंचि चंडिका उतरी
वाटे मूर्छित पडली ती सिंहीनें हटाविली कुतरी १२
खंडी शूलहि दुर्गा ज्यासि झुगारी अराति[12] चामर तो
न वधीं स्वयें तया कीं सांपडतो मृगवैरा[13] तिच्या मरतो १३
तों तो चढला अरिच्या हस्ति-शिरीं सिंह उडुनि वेगानें
ज्या उदयनगाग्रगशशि-[14] सदृशाच्या सर्वउडु निवे गानें १४
असुरांची काळ-मुखीं घ्याया भय पर-मनीं[15] चमू ढकली
जो हरि[16] करी तयाशीं तो चामर परम नीच मूढ कली १५

---

१ सिंहमस्तकीं, २ बाणरूपप्रहारातें, ३ परम-भव्य-भुजग-आभ-महाभुजगसदृशा (भुजाचें विशेषण), ४ खड्ग, ५ कः पदार्थ, ६ नक्षत्रसमूह, ७ केशासदृश. ८ अपवित्रमद्रदेशाला, ९ महिषासुराचा सेनापति, १० त्रिदश-अर्दन-देवांलागीं हादेणारा, ११ मत्त-सिंधुर-आरूढ-मदोन्मत्तहत्तीवर बसलेला, १२ शत्रु, १३ सिंहास, १४ उदय-नग-अग्र-ग-शशि-सदृश-उदयपर्वतवर्तीचंद्रतुल्याच्या, १५ शत्रूंच्यामनांत, १६ सिंह, + नीच, हलका, ÷ सर्वलोकरूपनक्षत्रें.

मेळविती सुभट यशें करुनि तनु-त्याग ज्या वरुनि मेहितें
भुजयुद्ध करित दोघे ते आले त्या गजावरुनि मेहितें १६
हरि शिरला द्रुत कंदुक+ महिवरुनि उडुनि जसा नभीं शिरतो
पुनरपि पडोनि उडवी तत्काळचि त्या सुराऽरिचें शिर तो १७
वधिला हस्तशिळांहीं दुर्गेनें तो उदग्र समरांत
जेणें तेज भिरविलें- होतें हो तें असह्य अमरांत १८
मथिला करोळहि रणीं त्यांपासुनि स्वदंत-मुष्टितळें
केलें सुयश करावें जीवां घ्यायासि जेथिं तुष्टि तळें १९
कोपोनि उद्धतानें चूर्ण करी ईश्वरी गदा-पातें
तें कुतुक देखत्यांचें वा एकाहि न लवलें तदा पातें २०
तैसेंचि भिंडिपाळें रण-रंगीं वाष्कळासि ती निवटी
जीची स्मृति न उरो दे दुःखासि पुढें तमा जसी दिवटी २१
चूर्ण करी बाणांहीं ताम्रासि तसेंच अंधकालाही
पक्षीश्वरदृष्टिपुढें केवळ होतोचि अंध कालाऽही २२
उग्रास्य उग्रवीर्य त्रिदशांचा रिपु महाहनुहि निसरा
हे मारुनि त्रिशूलें त्यांसि म्हणे पूर्व-कुमतिला विसरा २३
त्याहि बिडालाक्षाचें केलें खड्गें शिरोऽब्ज-कर्तन हो
कीं हर्षें विधि-हरि-हर- लोक-पति-सभांत गान नर्तन हो २४
दुर्धर दुर्मुखहि रणीं बाणांहीं यम-गृहासि पाठविले
ज्यांचे अपकार सदा देवांहीं हाय म्हणुनि आठविले २५
बळ-नाशें महिषासुर खवळे पापौघ मोह त्याला जो
तो कां न म्हणेल निपट- बाळ यमाच्या गमो हत्या लाजो २६

---

१ पूज्यें (यशांचें विशेषण), २ पृथ्वीतें, ३ नामविशेष दैत्य, ४ धरूनि, ५ आपले दंत आणि मुष्टितळ (चवराक) याणें, ६ सरोवर, ७ पक्षि-ईश्वर- दृष्टि- गरुडाच्या दृष्टिपुढें, ८ छ्यासर्प, ९ शिरकमलाचें खंडन, १० अन्याय, ११ पापपर्वत. + चेंडू

तो कोप आंत बाहिर म्हणवाया त्रिभुवना अहेह त्याला
गण-बळ मर्दी तेव्हां प्रळयींचे लाजले अहेह त्याला २७
किति गण तुंडाघातें वधिले महिषाऽसुरें रणीं रागें
किनिक खुर-क्षेपांहीं पद्म जसें मर्दिजे महानागें २८
पुच्छें किति लोळविले किति शृंगांहीं विदारिले क्रूरें
निश्वास-वेग-नाद- भ्रमणांहीं किनिक नाशिले शूरें २९
झालें प्रथम बळ-पतन सर्व सविस्तर न बोलवे गा तें
धांवे हरिशी वधाया पवनाच्या करुनि फोल वेगातें ३०
येतां निजसिंहावरि पाहे कोपोनि अंबिका याला
झालेंचि म्हणे याच्या भिन्न जल तृणाऽग्र-लंबि कायाला ३१
तें महिष करी चेष्टित करितो सोडूनि सोय रेडा जें
सुर म्हणति शेवटींचे स्फुरवाया गृध्र सोयरे डोजें ३२
शृंगांहीं गिरि उडवी वेग-भ्रमणेंचि भूमिला फाडी
उसळोनि जलधि बुडवी तो पुच्छें त्यासि जेधवां ताडी ३३
त्याच्या शृंगोघातें बहु झाले खंड खंड घन झडले
श्वासें उडोनि गगनीं गेले तृणसे पुन्हा अचळ पडले ३४
यापरि बळ-मायांच्या फुगला होता मनीं लुलाय शतें
किति वर्णावें कथितों जगदंबेचें नृपा तुला यश तें ३५
कोप करी आंगावरि येतां पाहोनि चंडिका यातें
कांपवि बांधुनि पाशें प्रबळाही जेंवि आंडि कायातें ३६
तत्काळ बद्ध होतां असुरांचा भूप रूप तें सोडी
हरि होय तोंचि खड्गें त्या शत्रुशिरास ती सती तोडी ३७

---

१ खेदार्थी अव्यय, २ दिवस, ३ महिषाला, ४ तृणाच्या अग्रभागीं रहाणारें, ५ मस्यें, ६ शृंग-आघात- शिंगांच्या ताडनानें, ७ पर्वत, ८ महिषासुर.

तों खड्ग-चर्म-धर तो होय पुरुष परम दक्ष मायावी
त्यासि शरांहीं मारी नच हरितां पर-मद क्षमा यावी २८
मग होय महागज तो गर्जे ओढी हरीस धरुनि करें
कर तोडिला कृपाणें जैसा रंभाऽभिधान-तरु निकरें २९
पुनरपि हिता गमे त्या दुर्मतिच्या चाकरासि कोसरता
दुसरा मागें येतां अमरत्वाचा करा सिका सरता ४०
त्रैलोक्य तसेंचि पुन्हा तो महिष क्षोभवून मनाच
बहुधा म्हणे शिवा सुर- मुनिस कलह लोभवू नमीं नाच ४१
कोपोनि जगन्माता पान करी अरुण-लोचना मग ती
हांसे पुनः पुन्हा पर- भर वारुनि हर्षवावया जगती ४२
बल वीर्यमदोद्धत तो असुरहि गर्जोनि शैल शृंगांनीं
उडवी तिजवरि वरिलें जीचें पद-पद्म साधु-भृंगांनीं ४३
परमेश्वरीहि सोडुनि खरतर-शर-निकर बहु तिहीं तूर्ण
द्वेषि-प्रेषित-पर्वत सर्व तदुत्साहसह करी चूर्ण ४४
कवि-सुर-गंधर्व जिच्या पद-भक्ति-प्राप्त-पद-नरा गाती
अस्पष्टाऽक्षर बोले पानमदोद्धूतवदनरागा ती ४५
पीतें मधु तों मूढा गर्ज क्षणभरि धरूनियां गर्वा
म्यां तुज वधितां येथें गर्जतिल क्षिप्र देवता सर्वा ४६
वदुनि असें उडुनि चढे पृष्ठावरि जरिहि तो महिष झाडी
पादें आक्रमण करुनि कंठीं शूलेंकरूनि ती ताडी ४७
झाली त्रिभुवन-सुखदा ते अतिअद्भुत करूनि कर्म असी

---

१ खड्गानें, २ रंभानामक वृक्ष (केळीचा रवांब), ३ महिषरूपत्व, ४ मीतनाहींचं, ५ आरक्त नेत्र जीचे असी, ६ शत्रूंचा भार, ७ बल-वीर्य-मद-उद्धत- बल, शौर्य आणि गर्व यांहीं माजलेला, ८ चरणभक्तिरूप मिळालें स्थान जास अशा मनुष्याला, ९ पान-मद-उद्धूत-वदन-राग- मद्यप्राशनाच्या केफानें चंचल आहे मुखाची लाली जीच्या असी.

तों निज-वदनापासुनि असुर निघाला धरूनि चर्म असी ४८
अर्ध-विनिर्गत होतां केला तो आद्य-शक्तिनें रुद्ध
शुद्ध यशोर्थ नसाही श्रीदुर्गेशीं करी महायुद्ध ४९
तेव्हां दिव्य-कृपाणें मस्तक-खंडन करूनि असु-रहित
तो महिष पाडिला श्री- देवीनें जो सदैव असुर-हित ५०
ज्या घाया सु-कवि-मनीं निर्दयपत्यंतकोपमा यावी
वधिला देवीनें या- परि तो अत्यंत-कोप मायावी ५१
महिष-वधें खळबळलें वातें बहु जेविं तोय खळबळतें
हा हा म्हणुनि पलायन- परचि निहित-शेष होय खळ-बळ तें ५२
सुरगण सकळ सबळ-खळ- महिष-वधें जाहले परम हर्षी
स्तविती जगदंबेतें नारद-सनकादि जे पर महर्षी ५३
जे नटति अप्सरोगण ते मोरचि गान तो अनघ टाहो
निववी यशोमृतातें वर्षुनि जी ती शिवा घन-घटा हो ५४

द्वितीयचरित्रसमाप्त.

## अध्याय. १

श्री-विद्या-बळ-मत्त प्रभु शुंभनिशुंभ जाहलेहोते
शक्रादि-लोकपाळां- करवींच पदासि लाहले हो ते १
काळातेंहि न भीती जे ते भीतील दैत्य कां पविते
नहुळ सुरांसि कांपवि जेविं दरिद्रासि शैत्य कांपवितें २
तीतें शक्रादि-सुर स्तविती जाउनि तदा हिम-नगातें
जीच्या वात्सल्यातें सर्व-सु-कविंचे सदाहि मन गातें ३

१ ढाल, २ तलवार, ३ अर्धाबाहेरपडलेलाअसा, ४ उत्तमखड्गानें, ५ प्राणरहित, ६ देत्यांचाहितकर्ता, ७ निर्दय-पति-अंतक-उपमा-निर्दयांचापतिजोअंतक त्याचीउपमा, ८ मेघसमूह, ९ पावले, १० वज्रातें, ११ हिमाचलातें.

सुर-जन करीत होता केवळ दीनाजनासम स्तवन
तद्देचि नस्तवनादें नादमयचि होय तें समस्त वन ४
तों त्यास्थानीं गौरी ये गंगा-तोय-मज्जन कराया
जी त्या हिमालयातें म्हणते हो होय मज्जनक राया ५
जी म्हणते निज-दासा- हुनि सुरभींचा न वत्स भासुर हो
ती त्यांसि पुसे करिती कोणाचा स्तव भवत्सभा सुरहो ६
तों तच्छरीरकोशा- पासुनि सहसा निघे शिवा मग ती
स्तवुनि मज म्हणे केलें शुंभ-निशुंभादिशत्रुनीं अगती ७
झाली शरीरकोशा- पासुनि यास्तवचि कौशिकी नामें
तद्दर्शनींच आलीं जीं नच्हतीं तीं सुर-व्रजीं धामें ८
निघतांचि शिवा झाली कृष्णा जी तप्त-कांचन-च्छवि ती
गौरीस कालिका हें ठेवुनि अभिधान यास्तवें स्तविती ९
होती हिमाऽचलीं श्री- जगदंबा परम सुंदरी तीतें
खळ चंड मुंड देखति जे वश सुंदोपसुंदरीतीतें १०
ते दुष्ट भृत्य तेथुनि जाऊनि कु-शील-मद्य-कुंभातें
स्व-स्वामीनें भेटुनि ऐसें प्रार्थूनि वदति शुंभातें ११
सुमनोहराकृति महा- राजा आम्हीं विलोकिली महिला
शोभविती निरुपम-निज- देह-द्युतिनें हिमाऽद्रिच्या महिला १२
उत्तम रूप तसें तों कोणीं कोठें न देखिलें होतें
जाणों न करें विधिनें चतुरें चित्तेंचि रेखिलें हो तें १३
ती कोण स्त्री प्रभुनें शीघ्र निपुण शोध करुनि जाणावी

---

१तव्-रचित-स्तव-नाद-त्या देवांनी केलेल्या स्तुतीच्या नादानें, २मत्-जनक-माझा बाप, ३तेजस्वी, ४भवत्-सभा-तुमचीसभा, ५तत्-शरीर-कोश-तीच्या अंगा पासून, ६गतिहीन, ७देवसमूहीं, ८तेजें, ९तापलेल्या सुवर्णा सारिखी कांतीजीची असि, १०दुष्टस्वभावरूपमद्याच्याकुंभातें (कलशातें), ११स्त्री १२भूमीला.

देखावी स्वामीनें घ्यावी निज-मंदिरासि आणावी १४
देवा देह-द्युतिनें ती युवति दिशा दहाहि शोभविते
जसि चंद्रिका चकोरा तसि जो प्रेक्षक तयासि लोभविते १५
रत्नें मणि गज वाजी जे जे उत्तम पदार्थ लोकांत
ते ते सर्वहि सांप्रत शोभति शुंभा तुझ्याचि ओकांत १६
ऐरावत गज-रत्न द्रुम-रत्नहि पारिजात हय-रत्न
उच्चैःश्रवाहि शक्रा- पासूनि त्वां आणिला करुनि यत्न १७
जें अत्यद्भुत दिव्य ब्रम्ह्याचें हंस-युक्त अजि राया
तुझिया विमानरत्नहि सेवितसे सर्वकाळ ओजिरा या १८
निधि-मुख्य महापद्महि धनदापासूनि आणिला आहे
तुजला दिली समुद्रें माला अम्लान-पंकजा बा हे १९
वारुण कनक-स्रावी छत्र तुझ्या मंदिरीं असे स्वामी
पूर्वी प्रजापतीचा जो रथ-वर तोहि या असे धामीं २०
त्वां मृत्यु-शक्ति हरिली जीचें उत्क्रांतिदा असे नाम
कोणा अर्थाविषयीं सफळ न झाला प्रभो तुझा काम २१
पाश सलिल-राजाचा तव अनुजाच्या परिग्रहीं धन्या
ज्या ज्या समुद्र-जाता त्या त्या सद्रत्न-जातिही अन्या २२
तेशींच अग्नि-शौचें दहनेंही तुज दिलीं प्रभो वस्त्रें
यापरि सकळें रत्नें त्वां प्रभुनें स्पष्ट जोडिलीं शस्त्रें २३
मग रत्नभुग्वरें त्वां ऐसें स्त्रीरत्न कां न जोडावें
या लाभाकरितां तों कुशळें सर्वस्व तुच्छ सोडावें २४
खळ-भृत्य-कथित कुमत श्रवण करुनि दुष्ट-मति सरा-कुंभ
न करुनि विचार कांहीं निज-दूतातें असें म्हणे शुंभ २५

---

१ मंदिरांत, २ अंगणास, ३ वरुणाचें, ४ मरणदेणारी, ५ संग्रहीं, ६ रत्न-भुक्-वर-रत्नभोक्त्यांतश्रेष्ठजो तूं त्या तुवां.

कग्रीवा शीघ्र करीं  जेणें वश होय रत्नभूता तें
सांगे मदांध जैसा  वेताळ कथादि-यत्न भूतातें २६
कासार[1] असे समुचित  तो नव-संगम करापगे[2] ज्याह्नो
ऐसें म्हणावया त्या  परमशिवेप्रति कराप गेला हो २७
दूत म्हणे देवि जसा  जलनिधि-पानें प्रसिद्ध कुंभज या
त्रैलोक्यांत तसाचि  प्रख्यात असे करूनि शुंभ[4] जया २८
जो अहेताज्ञ[3] कांत  स्वजना बहु देतसे मह[5] हृतारी[5]
असकां प्रताप ज्याचा  व्यसनी म्हणउनि परी अहहृ तारी २९
दैत्येश्वर परमेश्वर  माझ्या वदनेंकरूनि आपण तो
श्रवण करावें त्यां तें  देवि त्वदनुग्रहार्थ[7] जें म्हणतो ३०
त्रैलोक्य सकळ माझें  मजला झालें समस्त कर वश तें
यश ऐकिलें जगें जें  विश्रुत गंधर्व-राज-कर-रव-शतें ३१
इंद्रादिदेवता मी  सेवितसें सर्व-यज्ञ-भागांतें
माझा प्रताप दुःसह  अहितांतें गरुड जेविं नागांतें ३२
लोकत्रयांत रत्नें  जीं जीं ऐरावतादि[8] गज-रत्नें
होतीं ज्यांचीं त्यांहीं  आणुनि मज तीं समर्पिलीं यत्नें ३३
क्षीरधिमथनोद्भव जो  नामें उच्चैःश्रवा यशीं सजला
हरि-वाहन हरि-रत्न[9]  प्रणत-करांहीं समर्पिला मजला ३४
जीं रत्नें देवांचीं  गंधर्वांचीं तशींच नागांचीं
तीं झालीं प्राप्त मला  क्हावींच फळें जशीं स्व-यागांचीं ३५
स्त्री-रत्न मानितों तुज  लोकीं मी रत्न-मात्र सेवितसें
ये मजकडेचि आलें  रत्नांतर निज-यशोऽर्थ देवि तसें ३६

---

१ तलाव, २ हे गंगे, ३ अहत-आज्ञ- अखंडितआज्ञाज्याचीअसा ४ शुंभाचेंविशेषण, ५ उत्सव, ६ शत्रूला, ६ खेदार्थीअव्यय, ७ त्वत्-अनुग्रह-अर्थ-तुजवर अनुग्रह करण्याकरितां, ८ इंद्राचेंवाहन, ९ घोड्यांमध्येंरत्न असा (उच्चैःश्रव्याचेंविशेषण).

स्त्री-रत्न म्हणुनि भज तूं मज करित्या शत्रु-हानि शुंभातें
कीं गुरुपराक्रमा या मत्तुल्या मदनुजा निशुंभातें ३७
तूं मत्परिग्रहास्तव परमैश्वर्यासि पात्र होशील
व्हायासि मत्परिग्रह तुजवरिच तुझें प्रसन्न हो शील ३८
दुर्जनदूतोक्त असें ऐके ऐकों नये कधीं परि तें
गंभीर अंतरीं स्मित करुनि भगवती स्वयें वदे अरितें ३९
दूता किमपि न मिथ्या तूं वदलासि स्व-वृत्ति-हित साच
त्रैलोक्याचा अधिपति शुंभ जसा तो निशुंभहि नसाच ४०
तरि कां अवश्य न म्हणशि ऐसें वदशील सांगतें परिस
सोडूं नये प्रतिज्ञा धर्म नसे सत्य-भाषणा-परिस ४१
अल्प-मतित्वें आपण हा पण दूता मनांत म्यां पहिला
केला आहे अनृता भ्यावें तितुकें भिऊं नये अहिला ४२
जो मज जिंकील रणीं मम-गर्वातें करील जो दूर
तो मज समबळ माझा भर्ता होइल जनांत जो शूर ४३
ऐसा मत्पण यास्तव करुनि रणीं गर्व-हानि शुंभानें
किंवा शीघ्र धरावा जिंकुनि मज पाणि हा निशुंभानें ४४
दूत म्हणे गर्विष्ठे न वद असें मजपुढें कसें वदसी
शुंभ निशुंभ स्कदुर्जय कंप-द पविपाणिलाहि कीं तदसी ४५
त्रिजगीं कोण पुरुष तो शुंभ-निशुंभासमोर राहेल
पाहेल घूक रविला काय शशा हरि-प्रहार साहेल ४६
अन्या दैत्यांहि पुढें सर्व-स्कशंचेहि कांपती काय
मग शुंभादिसमक्ष स्त्री जी न धरील कांप ती काय ४७

१ मत्-परिग्रह- माझी स्त्री झाल्यामुळें, २ स्वभाव, ३ दुर्जन-दूत-उक्त-दुष्टदूताचें भाषण, ४ इंद्रालाहि; ५ तत्-असि-त्यांचा खड्ग, ६ दिवांधपक्षी (घुबड), ७ सिंहाचा मार, ८ देह, ९ प्रश्नार्थक अव्यय, + ऐक.

जाशील एकली स्त्री तूं केसी त्यासमोर उत्साहें
स्पष्ट तुझें तुज देइल जोडुनि अविचार शील कुत्सा हें ४८
अभिमान मनीं धरिला तो द्याया दुःख-रौरवा जागे
देवि न होउनि केशा- कर्षणनिर्धूतगौरवा जा गे ४९
देवी दूतासि म्हणे वदलासि जसें तसेंचि हें आहे
शुंभ नसाचि निशुंभ प्रभुपणही न स्व-लंघना साहे ५०
काय करूं मी केली न विचार करूनि अशी प्रतिज्ञा त्या
जा सांग असें कृत-पण- रक्षाऽर्थ धरूनि असिमति ज्ञात्या ५१
ध्यावें स्व-पणापूर्वी म्यां आतां भिउनि काय गा होतें
माझा निरोप सर्वहि सांग तया योग्य जें करो तो तें ५२

---

## अध्याय.२

प्रकुपित दूत सविस्तर शुंभासि शिवोक्त सर्व आयकवी
विघ्नित-काम-खळाचा वर्णील क्रोध-वेग काय कवी १
त्या दूतोक्तश्रवणें कोपें अत्यंत तापला खळगा
व्यसनांत आपणाला पाडी मद जेविं आपला खळगा २
घ्यावें फुटकें तुंबी- फळ गंगा-लंघनाऽर्थ बोहूनी
हें कार्य तसें सांगे मूढा असुराऽधिपास बोहूनी ३
हे धूम्रलोचना त्वां दानें मानेंहि नित्य जी तुष्टा
स्व-चमू घेउनि सत्वर जावें जेथें असेल ती दुष्टा ४
केशांतें धरुनि बळें आकर्षुनि करुनि विव्हळा वीरें
आणावी जाणावी आज्ञा निःसंशाया तुवां धीरें ५
तीनें रक्षाया तरि तेथें कोणी उठेल जो दक्ष

---

१ निंदा, २ केश-आकर्षण-निर्धूत-गौरवा- केशांच्या ओढण्यानें गेलें गौरव (गुरुत्व) जीचें असी., ३ शिवा-उक्त- देवीचें भाषण, ४ भुजांनीं, ५ बोलावून.

मारावाचि असो पर तो स्मर गंधर्वराज कीं यक्ष ६
साठ-सहस्त्र असुर-बळ घेउनि लंघावयासि तो मले-धी
पावे श्रीदुर्गेतें वेळेतें खवळला जसा जलधी ७
जी व्यसन आश्रितांस न बाधों दे जेविं घन-घटा ऊन
त्या भगवतीस तो खळ बळ-मत्त असें वदे दटाऊन ८
शुंभ-निशुंभापाशीं चाल तिल्हि हिन नसे दुरभिमानी
त्या प्रभुच्या आज्ञेनें सर्वस्व-हितावहा स्मरभि मानी ९
प्रभुची आज्ञा मोडिशि आवडली तुज नवीच कां चाल
प्रभु शार्ङ्गवंशासि म्हणे नय कीं पाशीं पडोनि कांचाल १०
तूं नीतिने जरि न त्या मत्स्वामि-समीप धरुनि मद येशी
केशीं कवळुनि ओढुनि नेइन कीं कुजन पात्र न दयेशी ११
जगदंबा त्यासि म्हणे दैत्येंद्रें धाडिलासि या काजा
तूंचि बळी बळ-वेष्टित जरि नेसिल यत्न काय तरि माजा १२
नेसिल बळेंचि मज कीं तूं बळवान् ज्ञान-धर्म-नय शस्त्री
कलह करुनि पुरुषाशीं तेजें साधी न शर्म न यश स्त्री १३
तो समजे देवीनें रचिल्या विपुला निजोपहासासी
तीवरि धांवे व्याघ्री-वरि ओतुनरसा सकोप हा सासी १४
हुंकारेंचि तयातें सहसा परमेश्वरी करी भसित
प्रकटी यश दरहिमकर-दुग्धाब्धितरंगहरहरीभसित १५
क्रोधें तेहि खवळले गर्वें कोठेंहि जे न पर मानी
पर्मांती करि त्यांची तत्काळचि सहमृगेंद्र परमा ती १६
त्याधूम्रलोचनाचा तत्सैन्याचाहि नाश कळला हो

---

१ मलिनबुद्धिज्याचीकिंवामलाचा (पापाचा) समुद्र, २ स्मरव, ३ निज-उपहास-आपल्या थट्टेला ४ वाक्यासारिखा, ५ सरवड, ६ भस्म, ७ दर-हिमकर-दुग्ध-अब्धि-तरंग-हर-हरि-इभ-सित-शंखचंद्रक्षीरसमुद्राचीलहरी महादेवआणिइंद्राचाऐरावतयांसारिखेंशुभ्रअसे (यशाचेंविशेषण), ८ मावळी, + तोरानें, + वाक्-वंश-वाणीच्या विस्तारांला, ÷ परंतु ‡ माझा

शुंभ म्हणे ती दुष्टा या कर्माचें यथार्थ फळ लाहो १७
आज्ञा करी शिवेवरि जाया तो शुंभ दैत्य मुंडातें
जेणें निवेदिली ती त्या चंडातें तयाहि मुंडातें १८
रे चंडमुंडहो जा सत्वर घेऊनि विपुल-सैन्यातें
आणा रवाणा तन्मद-[1] गद द्या धिक्कार करुनि दैन्यातें १९
यानंतर अंबेतें ओढूनि बळें धरूनियां वेणी
किंवा बांधुनि आणा एकचि तुम्हीं असुर-वीर ती एणी[2] २०
अथवा गांठुनि समरीं असुरांहीं शस्त्र-शत-गणें अस्त्या[3]
सिंह वधूनि करावी ती सर्वीहीं झटोनि हतकेत्या २१
मग करुनि कठिन निज-मन वधन युवतीस बळकट करा हो
तुमचें असावध स्त्री ती धरित्याहीं न पळ कटक राहो २२
कार्य-करां भृत्यांवरि पूर्ण प्रभुचा प्रसाद हें जाणा
साधु असाधु करा परि बहु सत्वर मत्समीप ती आणा २३

---

## अध्याय.३

ते चंड-मुंड तेथुनि गेले घेऊनि कटक चतुरंग
ज्याचे[4] रजें मळविती दिगिभकटींहि[5] न स्व-भट-कच[6] तुरंग १
जें प्रिय वाहुनि चरणीं फळ जळ दळ एक सुमहि[7] मागा तें
ऐसें जी माय म्हणे जीचा कवि-वृंद सु-महिमा गातें २
तीतें तुहिन-नगाच्या[8] कांचन-शृंगीं सलील बसलीतें
ते खळ देखति सिंहीं कांहींसें हास्य करित बसलीतें ३

---

१ तत्-मद-गद-तीचागर्वरूपरोग, २ हरिणी, ३ मेल्यासारिखी, ४ ज्यासे त्याचेतुरंग, ५ दिक्-इभ-कट-दिग्गजांचीगंडस्थळेंहि, ६ आपल्यायोध्यांचेकेश, ७ पुष्पहि, ८ हिमाचलाच्या.

पाहुनि सिद्ध भराया झाले दुर्गेसि बहुत पामर ते
नच शकते जरि शतदा नियमें साधूनि बहु तपा मरते ४
कोपे त्यांवरि देवी तें जें शरदिंदुकांतिचें[1] सदन
झालें कज्जल-वर्ण क्रोधें तत्काल तें तिचें वदन ५
झालें ललाट नीचें सहसा क्रोधें करूनि जें कुटिल[2]
तेथुनि काली प्रकटे वाटे काळादिकांसि ती कुटिलें[3] ६
ती खड्ग-पाश-हस्ता अत्युग्रा त्या करारि-कटकांत
शिरली सशांत जैसी व्याघ्री श्येनीहि जेविं चटकांत ७
वीरांसह कवळ जसा हय रथहि तसाचि ती करी सगळा
जीचा न चाविला जो त्याहि करवें वाट दे करीस गळा ८
तीच्या दशनांसि कठिण पर-शस्त्रांचे न रासि पापडसे
नदेहा अरत्र जसें न ब्रम्हज्ञा न रासि पाप डसे ९
सर्वत्र पाविजेला क्षणमात्रें नाश चंड-सेनांहीं
करिती परांसि चरणांहि कालीचे काळ-दंडसे नाहीं १०
जे प्रबळां असुरांतें कालीचे चूर्ण करिति दंत कसे
ते न म्हणावे चंडें मुंडें अत्युग्र मूर्त अंत कसे ११
ज्यातें अवलंबुनि ज्या निज-शत्रु-बळासि नुहरि खपवी तें
खपवूनि कालिका त्या देईल न लाज न हरिख पवीतें १२
चंडाच्या शस्त्रांचा न करि तिचें गरळ-कटु निकर कांहीं
मुंडायुध-दृष्टिहि नग भग्न न केलाचि झटुनि कर कांहीं १३
मुंडें सहस्रशः क्षय त्या कालीचा करावया वक्रें
शक्रें ज्यां जोडावे कर ऐशीं सोडिलीं महाचक्रें १४

---

१ शरत्-इंदु-कांति-शरदृतुसंबंधीचंद्राच्यातेजाच्चें, २ वांकडें, ३ तुडवील, ४ चिमण्यांत, ५ दंतांसि, ६ सिंह, ७ हर्ष, ८ वज्रातें, ९ समुदाय, १० गारानीं.

ऋषहु दिवाकर-बिंबें    जैशीं मेघोदरीं तशीं शिरलीं
काली-सुखांत चक्रें    जेविं अपकृतें[1] महाशनीं[2] जिरलीं    १५
चक्रें गिळोनि काळी    त्रिभुवन-भय-कारका महास्यातें
पसरुनि करीं धरुनियां    ऋर-रिपु-वध-सारकाम हास्यानें    १६
जेणें हरिलीं होतीं    अमर-नरांचीं किरीट मुंडासीं[4]
काळी खवळुनि कवळुनि    कटक भिडे ऋरजयार्थ मुंडासीं    १७
काळीनें धरिला जो    प्राशाया पर-नमासि असि-तरणी
प्रसवे धवळ-यशा जरि    आपण वर्णीकरूनि अमित रणीं    १८
धांवे वेगें परम-    क्षुधिता धृष्टाखुवरि[7] जसी व्याळी[8]
त्या पुंडा मुंडाचें    मस्तक खंडी महासिनें काली    १९
त्या चंड-मस्तकातें    खंडी त्याच्या कचांसि कवळून[9]
खवळूनि रणीं ऋरखवी    विश्वास यशें अशेष धवळून    २०
त्याचें हत-शेष बळ न    टिकलें कालीपुढें भयें पळतें[10]
सर्व पळालें जैसें    तिमिर दिनेकर[11] प्रभोदयें पळतें    २१
जें चंड-मुंड-मस्तक-    युग काली दे तिला[12] उपायन[13] तें
केले पुरुषार्थांचे    सफळचि ज्या सर्वही उपाय न तें    २२
काली म्हणे महापशु    दिधले म्यां चंड मुंड तुज आधीं
शुंभ निशुंभ शिवे तूं    वधुनि रण-मखीं यश स्वयें साधीं    २३
देवी म्हणे मजकडे    तूं घेउनि चंड मुंड आलीस
यास्तव तुज चामुंडा    हें दिधलें ख्यात नाम आलीस[14]    २४

---

१ अपथ्यें, २ अतिखाणाराचेठायीं, ३ मुकुट, ४ पागोटीं, ५ खड्गरूपसूर्य, ६ काळी, ७ धृष्ट-आखु- दांडग्याउंदरावर, ८ सर्पीण, ९ ऋमकरून, १० पळभर, ११ दिनकर- प्रभा-उदय- सूर्यतेजाच्याउदयानें, १२ शिवेला, १३ नजराणा, १४ सखीस.

# अध्याय.४

शुंभ क्रोधें खवळे श्रवण करूनि चंड-मुंड-बध-वार्ता
आज्ञापी सैन्यातें तो ज्याच्या स्वस्त्रियाहि अधेवार्ता १
जे कंबु-धौम्र-कालक दौर्हृद-मौर्यादि सर्व ते योध
घेउनि शुंभ निघाला गेला देवीसमीप सक्रोध २
देवी पाहे आलें अतिभीषण दैत्य-सैन्य जें तूर्ण
स्वधनुर्गुण-नादांहीं करि भू-गगनावकाश ती पूर्ण ३
सिंहहि बहुतचि गर्जे कालीही गर्जना करी मोठी
त्या नादातें परिसुनि असुरांच्या त्या वधीत ती कोटी ४
तें विधि-हरि-हर-वासव- देहापासूनि निघोनि तद्रूपा
शक्ति शिवाप्रति आल्या देवहितपराहितार्थ ज्या भूपा ५
त्या शक्तींसह येउनि ईशान-प्रभु असें शिवेशि वदे
मत्प्रेमें शीघ्र असुर मारुनि विश्वासि तूं शिवे शिव दे ६
तों त्या देवी-देहा- पासूनि निघोनि चंडिका शक्ती
पावे परम-भयंकर मूर्ति शिवाशतनिनादिनी व्यक्ती ७
वात्या[४] उन्मूलन या सर्वाऽमर-साधु-रिपु-चमू-कदली
प्रकटुनि ईशानातें मग ती अपराजिता असें वदली ८
भगवंता दूतत्व स्वीकारुनिया क्षणींच तूं आंगे
सत्कीर्तिस्तव जा त्या शुंभनिशुंभाकडे असें सांगे ९
त्रैलोक्यातें पावो शक्र जयाचें तयासि ओपावें
सेवोत अमर हवितें धर्म तुम्हांतें म्हणोनि ओ पावें १०
जरि आपण वांचावें ऐसें इच्छित असाल आजि तरी
पाताळाशि तुम्हीं जा साम करीं हित-करी न ओजितरी ११

---

१ पतिवियोगें करूनपीडित, २ देवांच्याहितार्थआणिशत्रूंच्याअहितार्थ, ३ कल्याण, ४ वावटळ, ५ युद्धरूपनौका.

बळ-गर्वें रण-कामचि तरि त्यां केला असे पुढें कर या
माझ्या देवीत शिवा तुमच्या मांसें करूनि देंकर यो १२
कथुनि असें पाठविला दूत-पणें शिव म्हणोनि ती देवी
शिवदूती भक्त सदा या सन्नामा स्वधाधिका सेवी १३
कथिला त्या देवीचा तैसाचि निरोप तो तयां शर्वें
गर्वें मान्य न केला दुष्टांहीं ज्यांत मंगळें सर्वें १४
शिव झाला दूत वृथा मरति म्हणुनि बहु दयालु कळवळला
परि त्याच्या हित-बोधें दोघांतुनि एकही न खळ वळला १५
शुंभ शिवेवरि गेला स्व-भट पुढें करूनि सर्वही राजा
वंदीलचि कर जोडुनि सांडुनि काठिन्य-गर्व हीरा ज्या १६
विविधायुधवृष्टि असुर सर्वहि कात्यायनीवरि करीती
न तशा मेघांच्या त्या प्रळयींच्या साजती बरिक रीती १७
देवीचे दिनकर-कर- खर-तर शर पर-विमुक्त-शस्त्रांतें
भस्म करिति तत्काळ ज्वाळ जसे धौत-सूक्ष्म-वस्त्रांतें १८
मारीती ब्रम्हाणी स्व-कमंडलु-वारिचे सडाके शें
परिभविली न परें जशि करिच्या स्वहृदेंहि हरि सदा केशें
माहेश्वरी त्रिशूलें चक्रें दैत्यांसि वैष्णवी मारी
तैशीच शक्तिनें ती देवी शिखि-वाहनाहि कौमारी २०
निज-चक्र-तुंड-दंष्ट्रें यांहीं मारी परांसि वाराही
तैशीच नारसिंही बहु भीं जीच्या नखांसि वाराही २१
चंडाऽट्टहास करुनि क्षितिवरि पाडुनि अनेक शिवदूती[१२]
भक्षी परं-भर हरि जीं[११] तिस साधु न भूमनें कशि वदू ती २२

१ माझ्याशिवा, २ महादेवानें, ३ सडाके, ४ शंभर, ५ सिंहाच्यामानेवरचा केंश, ६ मोरवाहनजीनें असी, ७ वायूहि, ८ भयंकरजें क्रोधानें हसणें तें, ९ अनेक दैत्य, १० शत्रूंचा भार, ११ शिवदूती, १२ भूमि, + विविध-आयुध-वृष्टि.

यापरि मातृगणातें  सकुपित पाहोनि पावले दैन्य
त्रासें पलायन करी  शुंभाचें निहत-शेष जें सैन्य  २३
तेव्हां होय महाक्रूर  परम कुपित रक्तबीज बा राया
धांवे मातृगणातें  अत्यद्भुत युद्ध करुनि माराया  २४
घाली तो ऐंद्रीशीं  गांठि करुनियां त्वरा गदापाणी
त्या सोप्मद होय कुलिश[2]  जैसें ओमज्वरा गदा[4] पाणी  २५
क्षत-रक्तबीज-देहा-  पासुनि जितुकाहि रक्त-बिंदु निघे
त्याचा होय महाक्रूर  जो किमपि उणेपणें न निंदुनि घे  २६
तत्तुल्याचा छाया  रक्ताचा मायबाप थेंब गळे
कीं चालती बकाच्या  बक बगळ्याच्याहि बा पथें बगळे  २७
ऐसे शतशः क्षतज-  प्रभव पुरुष रक्तबीज-सम राजा
सांगों काय करिति त्या  मातृगणाशीं असीम समरा ज्या  २८
ऐंद्रीनें क्षत केलें  शिर हाणुनि वज्र पुनरपि तयाचें
तद्रक्तज पुरुष वरिति  तच्छीलजसेंचि स्फुरत पितयाचें  २९
त्या शोणित-बीजातें  निज-चक्रें करुनि वैष्णवी ताडी
ऐंद्री कौमारीही  शूलें माहेश्वरी उरीं फाडी  ३०
त्या शक्तींतें ताडी  तो शोणितबीजही गदा-घातें
बहु मानवले सर्वहि  स्फुरत्याच्या त्या महागदाघातें  ३१
शक्तींनीं क्षत करितां  सर्वांगीं उसळले क्षतज-बिंदू
बहु कोटि पुरुष झाले  सिंधु-तरंगीं जसे तरणि इंदू  ३२
ते रक्तोद्भव पुरुष  व्यापुनि करिती भयार्त विश्वास
निश्वास उष्ण सोडिति  देव जयाचा नयेचि विश्वास  ३३

---

१ मारून उरलेलें. २ वज्र, ३ पक्क न झालेल्या ज्वरा, ४ रोगा, ५ तत्-शील-त्या रक्तबीजाचा स्वभाव, ६ महा-अगद-आघात-महारोगरूप जो तो रक्तबीज त्याच्या नाशानें, ७ समुद्राच्या लाटांत ८ जगास, ९ भरंवसा;

१त्याले निर्जर पाहुनि कालीतें चंडिका स्वयें सांगे
चामुंडे मुख पसरीं तूं खाद्य स्वादु सांडिशी कां गे ३४
माझ्या शस्त्राघातें अरि-रक्ताचा उडेल जो बिंदू
तो तव-मुखीं पडावा गुरु-पर्वीं जेविं राहुच्या इंदू ३५
जे रक्त-बिंदुपासुनि होतिल उत्पन्न पुरुष तव-तुंडीं
ते नच उरतिल पडले ३शलभ जसे दीप्त-वन्हिच्या कुंडीं ३६
पी रक्तातें घटघट गटगट ते गीळ जेविं अंजीर
तव-यश गाइल कविकुळ अवलंबुनि चरण जेविं ३मंजीर ३७
या युक्तिनेंचि होइल समरीं हा रक्तबीज ४नीरक्त
सर्वांहि तुझिया साऽमर +चांमर कर भक्त बीजेंनीं रक्त ३८
काली म्हणे शिवे तुज किति हा लघुकाय न पर मेरु चला
विश्वासनिदेश तुझा अमृताहुनि काय न परमे रुचला ३९
त्या शोणितबीजातें निजशूलें चंडिका नृपा हाणी
वाहे तद्देहांतुनि रक्त जसें टोंचितां गंदा पाणी ४०
जिकडे शोणित वाहे तिकडे पसरूनि ती वदन देवी
काली कराल-वदना त्या शोणित-बीज-शोणिता सेवी ४१
वदनीं होती त्यातें भावी बहु रूरस मानवे चावे
शतकोटि तद्दंदांनीं पर वृत्रास्फरसमान वेचावे ४२
रक्तज कुतर्कसे ती विद्याशी ते नवे नवे दमुनी
शुंभनिशुंभाहि मानी तिस केवळ मानवे न वेद मुनी ४३
शोणितबीज गदेनें तोडी परि चंडिकेसि अल्पाही
पीडा न उग्रहि गदा- घात करी जेविं हरिस तल्पाही ४४

१ देव, २ टोळ. ३ पादभूषण, नूपुर, पैंजण, ४ रक्तहीन, ५ वारण्याविषयीं, ६ गळूं इत्यादि रोगाला, ७ तत्-रद-तीच्यादंतांनीं, ८ शत्रु, ९ गणी, १० विष्णूस. ११ बिछानारूप शेष. + चंवरी हातांमधें ज्यांच्या असे,

देवी शूलें वज्रें खड्गें हाणी तसेंचि ऋष्टीनें
दृष्टीनेंहि हत करी अरितें खीळुनि बाण-वृष्टीनें ४५
काळी तद्रक्ताचे प्याया तद्वर्षित पाप थेंब हुत
निज-मुख-कुंडीं करि जरि मळला होताहि कौपथें बहुत ४६
केला निरक्त ऐसा अतिदारुण रक्तबीज तो खचला
सुर मुनि म्हणति नमुनि यश वर्णुनि देवूं शिवेसि तोखचला ४७
तो मातृगण प्रमुदित झाला विजयें करूनि मग नाचे
जयजयकारें भरिती सुर मुनि हृद्देश सर्व गगनाचे ४८

---

## अध्याय.५.

शुंभ-निशुंभ क्षोभे श्रवण करुनि रक्तबीजनाशातें
खळ-बळ सर्वहि खवळे कीं वश होणार काळ-पाशातें १
वाटे देवीस करुनि कलहा खल हा निशुंभ करिल गट
त्या मागूनि कराया दुर्गा-बळ-हानि शुंभ करि लगट २
करि शुंभनिशुंभांशीं ती शक्ति परा सुसंगर हितातें
साधुनि घाया शक्ता त्यातेंहि परा सु-संग-रहितातें ३
करिती जगदंबेवरि ते दारुण-बाणवृष्टि अहित रणीं
सोडी देवी शर जे असुहर तापद जसेचि अहि-तरणी ४
छेदुनि शर-जालातें घाया मद हरुनि कंप दोघांतें
सर्वांगीं शर हाणी देवी त्या असुरसंपदोघांतें ५
देवीच्या सिंह-शिरीं कोपें चाऊनि अधर अखालें
असुराधिपें निशुंभें धांवुनि केला प्रहार करवालें ६

---

१ कुमार्गानें, २ संतोष, ३ श्रेष्ठा (शक्तिशब्दाचें विशेषण), ४ सत्संगशून्यानें, ५ प्राणहरणारे, ६ संतापदायक, ७ असुर-संपत-ओघ-दैत्यसंपत्तीचे प्रवाह त्यानें, (शुंभनिशुंभांचें विशेषण). ८ हलका (असुराधिपें याशब्दाचें विशेषण) ९ तलवारीनें, + शस्त्रविशेषानें, + अंतराळें, ++ सर्प आणि सूर्य.

देवी स्वमनांत म्हणे शीघ्रचि हा निकर वाळविल यातें
ने बाणें छाया यत्- तेजो-हानि करवाळ विलयातें ७
तो शक्ति पुन्हा टांकी त्यावें समरांऽगणीं जिला शक्रें
तत्काळ भगवतीनें केली तैशीहि ती द्विधा चक्रें ८
शूल निशुंभ क्षेपी तों ये जैसा मदांध तूर्ण करी
त्यासि जसा सिंहीचा देवीचा मुष्टिपात चूर्ण करी ९
टांकी निशुंभ योजुनि जे साधिल कार्य हो गदा तीनें
तत्काळचि भस्म करी निज-शूलें क्षोभ-भोग-दे तीतें १०
न विचारी जड कीं जय साधिल देवी-रणांत परशु कसा
केला भग्न शिवेनें दिव्यशुकीनें क्षणांत परशुकसा ११
दुर्गेनें तो मूर्छित करितांचि करुनि पराभव निशुंभ
युद्ध करी आपणही जायासि मरुनि पराभवनिं शुंभ १२
ज्याचे दिव्यायुध-धर विश्वांत ख्यात आठ भुज गानीं
ज्यांसि दिली आकारें कोर्येही स्पष्ट पाठ भुजगांनी १३
दिव्य-रथावरि बैसुनि सर्वाऽसुर-राज शुंभ आला जो
त्या पाहुनि शंख शिवा वाजवि त्या कांन चंद्रमा लाजो १४
चाप-गुण-ध्वनिहि करुनि बहु आद्या शक्ति कांपवी जगती
सर्वाऽसुर-तेजोवध- कर घंटानादही करी मग ती १५
हरिनेंहि नाद केले पर-भट-नादासि जे अनादरिते
ज्यांहीं मदपूर्ण महा- गज झाले तत्क्षणीं अनाद रिते १६
काली उडोनि गगनीं स्व-कर-तळांनीं महीतळा ताडी
त्या नादें पहिले जे शंखादि निनाद ते उणे पाडी १७
ती शिवदूतीहि करी जी पण अत्युच्च साशंक घोर

१ तुकडे, २ हानि, ३ क्षोभभोगदेणारी तीतें, ४ देवलोकींच्याशुकीनें, ५ मानव लोकींच्याशुकासारिखा. ६ परलोकीं. ७ शंखवाला, ८ स-अश्व-सू-रथ-उर-

तेव्हां केले असुर- श्रासें सोडूनि सर्व सुर थोर १८
अतिशयित-क्रोधानें त्या समयीं शुंभ दैत्य तो पावे
चित्तीं म्हणे शिवेचे घ्यावे कीं स्वाऽसु तीस ओपावे १९
त्यासि म्हणे जगदंबा असुराऽपसदा रहा रहा नीचा
दिधला तुला वराया हस्तांत उदार हार होनीच्या २०
तेव्हां जय जय ऐसें म्हणतो गगनस्थ अमर परमेला
हाहि मरो शीघ्र जसा तो तुजशीं करुनि समर पेर मेला २१
शुंभ ज्वाला-माला- कुलवदना शक्ति भीषणा धाडी
करुनि निरास महोल्का- घातें परमेश्वरी तिला पाडी २२
राजा तेव्हां व्यापी शुंभाचा सिंहनाद विश्वास
तेचि न भ्याले बहु दृढ ज्यांसि महा-शक्ति-पाद-विश्वास २३
निर्घात-निस्वनानें शुंभाचा सिंहनाद लोपविला
जो पविला हुंकारें भंगद तो दैत्यराज कोपविला २४
शुंभाच्या बाणांतें निज-बाणांच्या शिवा महानिकरें
हानिकरें तीच्याही छेदी असुरेंद्र शत्रु हा निकरें २५
मग जगदंबा मूर्छित पाडी शूलें तयासि विंधून
देविप्रताप गमला तिळहि न घटे जोन तोहि सिंधून २६
तों तो निशुंभ सुर-रिपु उठला सोडुनि असावधानपण
करिता इतर शिवेच्या प्रत्यय येतां असा वधान पण २७
देवीतें काळीतें हरितें शर व्हावयासि यश हाणी
संपन्मदांधमति निज- परिणामनिरीक्षणीं नच शहाणी २८
होउनि अयुत-भुज असुर झांकी देवीस अयुत-चक्रांहीं
भ्यावें ज्यांसि यम-वरुण- यक्षप-वाताऽर्क-वन्हि-शक्रांहीं २९

---

१ तुला वराया हा मीच्या हातांत उदार हार दिला आहे, २ शत्रु महिष, ३ महाशक्तिच्या पांयींनिश्चय ज्यांचा ते, ४ घटज-ऊन- अगस्तीहून उणा, ५ सिंधु ऊन- समुद्राहून उणा, ६ संपत्- मद-अंध-द्रव्यमदानें आंधळी बुद्धी ती, + वज्र आला, * प्रतिज्ञा.

क्रूर-मति सहसा मोहीं चक्र-समूहीं जशीच ती लोपे
तेव्हां देवी बहुनचि समरीं दुर्गार्तिनाशिनी कोपे ३०
छेदी त्या चक्रानें स्वशरांहीं त्याहि बाण-जाळांनें
देवांतें स्वोत्कर्षें हृष्ट करी तप्त दैत्य-पाळांतें ३१
कुपितनिशुंभ शिवेचें चूर्णकरायासि उर गदा हातें
घडताळुनि धांवे तो जैसा धृतवैर उरग दाहातें ३२
समरांत निशुंभा जी होउनि तदराति यम गदा पावे
तीतें खड्गें खंडुनि देवीनें कोण न मग दापावे ३३
तरि मूढ शूळ घेउनि धांवे कीं जीस काळ घेरी ती
मति तुमजे बाळाची माझ्राहि होऊनि बाळ घेरीती ३४
दुर्गा मनीं म्हणे मम- शूलचि या शत्रुचें उर विदारू
कीं हा अरातिजीवन हर्दहि न दहनहि जसा उरवि दारू ३५
शूल धरुनि शुंभ-हृदय शूलेंचि विदारितां अगा राया
पुरुष निघे त्या भग्ना हृदया सोडुनि जसा अंगारा या ३६
भग्नेंनिशुंभहृदुद्गत रुमहाबळ पुरुष युद्ध-दृढ-निष्ठ
श्रीमज्जगदंबेतें बाहिर निघतांचि तो म्हणे तिष्ठ ३७
तों हांसूनि मस्तक हरि देवी न करूनि एक पळ उशिर
दुर्गाऽसिपुढुनि अरि जरि अहिपुढुनिहि बाळ-भेक पळउ शिर
ऐसा जगदंबेनें क्रूर-शत्रु निशुंभ हरुनि मद वधिला
जो मत्त म्हणत होता कोण करिल शस्त्र धरुनि मदवधिला
जें सैन्य निशुंभाचें क्रूर-दुःसह बहुत मातलें होतें
कालीनें काळमुखीं बाळमुखीं तेविं घातलें हो तें ४०

---

१ संकटनाशिनी, २ विषरूपसंतापातें, ३ भग्न-निशुंभ-हृत्-उद्गत-भेद पावलेल्यानिशुंभाच्या वक्षस्थळापासूननिघालेला, ४ उभीरहा, ५ हरणकरी, ६ दुर्गेच्या खड्गापुढुनि, ७ मत्-अवधि-माझ्यानाशाला, + काष्ठ, ⁎गृहा.

काांहीं शिवदूतीनें काांहीं सिंहें रणांत लोळविलें
काांहीं त्या मातृगणें स्वर्गाप्रति गोरवूनि बोळविलें ४१

# अध्याय.६

ज्याच्या दृष्टिपुढें सुर- सेना समरांत परम दैन्या त्या
शुंभ विलोकी निहता प्राणसम-ध्वस्तपरमद-भ्रात्या १
त्याहि विलोकी ध्वस्ता विध्वस्ताऽशेष-सुर-सभा सेना
ज्याच्या नव नव सुयशा- हूनि मना अमृत सुरस भासेना २
बंधु-वधें सैन्य-वधें शुंभ क्षोभे लयाऽग्निशीं तोले
त्या देवीस कडकडुनि जड कडु निपटुचि रणीं असें बोले ३
साऽहंकारे दुष्टे दुर्गे शौर्यें धरूं नको गर्व
अन्याचें बळ आश्रय करुनि करिशि युद्ध हें वृथा सर्व ४
श्रीदुर्गा त्यासि म्हणे रे दुष्टा ऐक साधु-धी-रहिता
मी एकलीच आहें या विश्वामाजि साधु-धीर-हिता ५
ज्या ब्रम्हाणि-प्रमुखा माझ्याचि विभूति जाण पापा हें
मजमाजि समस्ताही त्या करितात प्रवेश हा पाहें ६
हें म्हणतां ब्रम्हाणि- प्रमुखा त्या देवता स्व-गेहांत
सर्वा प्रवेशल्या त्या दुर्गेच्या तत्क्षणींच देहांत ७
देवीच्या स्तंदोतें निरूपिजे जेविं भूमि कुंभातें
नेउनि विलयासि म्हणे सर्वांच्या सर्वभूति शुंभातें ८+
होतीं प्रगट त्रिजगीं साधु-हित करुनि असाधु वध माजीं
त्यां आवरिलीं रूपें तीं सुबहुमतें श्रुतीस अधमा जीं ९

१ तुच्छा, २ समूहातें, +माझी.

मी एकलीच आतां उरलें आहें रणांत न चपाप
हूं हाण बाण जाण स्त्री न मज तुला घडेल नच पाप १०
ऐसें बोलुनि देवी आरंभी भव्य-समर- सत्रास
त्यातें पाहुनि झाले सर्व- महेंद्रादि अमर संत्रास ११
शस्त्रास्त्रें देवीनें जीं त्या समरांत सोडिलीं होतीं
शुंभें प्रतिशस्त्रास्त्रें योजुनि तत्काळ मोडिलीं होतीं १२
देवीही शुंभाच्या खंडी लीलेंकरूनि शस्त्रांतें
अस्त्रातेंही उडवी वात जसा शुष्क-सूक्ष्म-वस्त्रांतें १३
परमेश्वरी करी जें मी वर्णूं आज काय वा हें तें
परशास्त्रास्त्रातेंचि न दे बहुत शिव्याहि लाज बाहूंतें १४
कोंडी पळभरि शुंभ श्रीमज्जगदीश्वरीस शरभवनीं
पर-शर झाले दुर्गा- शर- वृंदीं जेविं सिंह शरभ-वनीं १५
म्हणति सुरी झगटलसे शिरिं घाया वामपाद परि मेला
परमेला हा जिंकिल तरि पुरवुनि काम पादप रमेला १६
स्वाच्छादक-शर-पटलें छेदुनि खंडूनि शुंभ-चापातें
जेविं परा विद्या जनि- मृति-हेत्वऽज्ञान-रूप-पापातें १७
मग शुंभ शक्तिनें धरि चक्रें खंडी तिलाहि परमा ती
शतचंद्र चर्म असि घे त्याचीहि करावयासि परि माती १८
चुरिलें शिवा-शरांनीं त्या असिसह चर्म रवि-कराऽमळ तें
कीं अविनीताचें यश करितांहि सहाय पविकरा मळतें १९
केला जगदाद्येनें लीलेनें संगरीं विरथ वकला
बहुधा बहुधार्ष्ट्यें घे मुद्गर न रहावया शिर थबकला २०

१ त्रासयुक्त, २ हुंकार, ३ श्रीमत्-जगत्-ईश्वरी-शोभायमानअसी सर्वजगाची धनीन (देवी) तिला, ४ बाणगृहीं, ५ ढाल, ६ शत्रु, ७ सूर्यकिरणासारिखेंस्वच्छ, ८ वज्रधरणाऱ्याइंद्राला, ९ वडवडला, १० उभाराहिला, + जन्ममरणाला कारणजेंअज्ञानरूपपापत्यातें, ✱ देवांगना, ✱ परंतु.

येतां धांवत खंडी बाणांहीं मुद्गरा शिवा राया
तरि येंचि शालि-राशि- मति जैसा मुद्गराशि वाराया २१
न पराभूतीसि साहे माशीशी स्पर्शतां जसा कुष्टी
जगदंबेच्या हृदयीं हाणी धावोनि दुष्ट तो मुष्टी २२
देवी क्षितिवरि धडडड पाडी हाणुनि उरीं अरीस तळें
होइल रूबहुमत कसें आत्मगुणें सागरापरीस नळें २३
सहसा उडुनि शिवेतें घेउनि गगनांत जाय मग नीच
जरिहि निराधारा ती करि अरिशीं बाहुयुद्ध गगनींच २४
तें प्रथम सिद्ध-मुनि-जन- विस्मय-कारक नियुद्ध बहु रुचिर
झालें त्या श्रीदुर्गा- दैत्याशीं खांगणीं अतुल रुचिर. २५
रुचिर नियुद्ध व्योमीं करुनि धरुनि अरि महरि सह गजातें
सुरवल्हाया फिरवि अधिक जरि सकळांपरि सहरिसह गजातें २६
फिरउनि भरभर गरगर अंबा लंबालि-संनिभ-रुकेशी
ती आपटी महिवरी शुंभ-तनू जीवनामति सुकेशी २७
उडुनि वळुनि मुष्टि सबळ कंदुकसा तो पुन्हा उसळला जो
त्या पाहुनि नम्र लवणें स्वप्न म्हणतां पुन्हा मुसळ लाजो २८
नीच निपट त्या हाणुनि मुष्टि विदारूनि वक्ष माराया
तेव्हां सदयाहि करी जगदंबा लेश न क्षमा राया २९
शुंभातें जयमूलें शूलें हृदयांत चंडिका ताडी
शत्रु-शतशमन-शीला लीलालेशेंचि भूतळीं पाडी ३०
झाला असतां तो खळ रुरु-मद-नग-भित् नव क्षम रणातें
पावे शूलाघातें होतां मग भिन्न-वक्ष मरणातें ३१

---

१ हस्ततलानें, २ बाहुयुद्ध, ३ ख-अंगण-आकाशरूप आंगण्यांत, ४ लांब आणि भ्रमर सदृश काळे जिचे केश असी, ५ चेंडू सारिखा, ६ नम्र होणें, ७ देवांचा गर्वरूप पर्वत फोडणारा, + सुरांचा समुदाय.

पडतां तेणें सकळा भू सद्वीपा ससागरा सनेगा
कांपविली एक न त्या देवींचें मात्र कांपलें मन,[1] गा ३२
मग लागल्या कराया राया मार्गेंचि यान सागरगा
तो जेथिं ताप-मोह- प्रद होय न तेथिं मानसा गेर गा ३३
विश्व प्रसन्न झालें होय जसें भास्करोदयीं कमल
उत्पात-मेघ शमले सर्व व्योम प्रकाशलें अमल ३४
झाले प्रहर्ष-निर्भर- मानस सुर जे महाधिनें गलित
गंधर्वीहीं केलें गान शिवासद्यशोमृतें ललित ३५
वाजविलीं बहु वाद्यें सुपटु-शत-सहस्त्र-वादकांहीं हो
तद्रव हित कर्णाला नच रुचला इतर वाद कांहीं हो ३६
अतिमुदित अप्सरांचे गण तेव्हां नाचले शत झाने
निजभान धरूं देती नच त्यांचे नाच लेश न ज्ञाने ३७
मंद सुगंध सुशीतळ वायु तदा लागले वहायास
सुप्रभ होय दिवाकर त्यातें पद्महि सुखें पहायास ३८
पेटत नव्हते पूर्वी जे अग्नि सुखेंचि पेटले हो ते
झाले स्विन्न मुदित मग होउनि बहु त्यांसि भेटले होते
कादंबिनी[3] शिवेनें जो शतमखमुख तयाहि लेखातें
चातक मयूर ऐसें तच्चरितहि अमृतवर्ष लेखा तें ४०

समाप्त.

---

१ समुद्रांगमनकरणाऱ्यानद्या. २ विष. ३ मेघमाला. + पर्वतांसहित. ++ यज्ञकर्ते. ‡ देवातें.

स र्व सं ग्र हे

# मोरोपंतकृत

# मदालसोपाख्यान

# आर्या.

# माधवचंद्रोबा

यांनीं

रा. रा. परशुरामबल्लाळगाडबोले

यांच्यासहाय्यानें

शुद्ध करून

लोककल्याणार्थ

स्वताच्या

शिलाछापखान्यांत छापिल्या



मुंबई

शाके १७८७

सन १८६५

## अध्याय 1

श्रीशंकरच्या प्रसादें झाली त्रिजगीं मदालसा मान्या
बुधहो या साध्वीतें सेवुनि कयशा न वदाल सामान्या 1
मार्कंडेय-पुराणीं या देवीचें चरित्र सन्महित
ज्याच्या गानें पानें होतें व्हावें नसेंचि जन्म हित 2
पूर्वी होता राजा नाम जया शत्रुजित् सदाधार
यत्कीर्ति स्फुरति-सेव्या अमृतरसाची जशी सदा धारा
त्याचा पुत्र ऋतुध्वज परगुण जैसा जयंत शक्राचा
मदहर गजयूथाचा सिंह तसा जो स्व-शत्रु-चक्राचा 4
ऋषि-नृप-कुमार भजति प्रेमें त्या सद्गुण-केलि-सद्मातें
द्विजरूप अश्वतर फणि- पति-पुत्रहि मधुप जेविं पद्मातें
एका समयीं ऐसें अश्वतर पुसे कुमार हो असतां
रात्रौ मात्र स्वगृहीं दिवसा कोठें सुबुद्धि हो वसतां 6
ते वदले नृप आहे शत्रुजिदाख्य प्रसिद्ध अनयातें
जो स्वर्गींहि नसाहे त्याच्या भुललों गुणाढ्य-तनयातें 7
सद्गुण-निधि तसा तोचि ज्ञातें बहुतचि तयास मानवतीं
जी साधुता तयाची वांछिति वर्णूनि देव मानवतीं 8
अश्वतर म्हणे सुत हो तो धन्य यदीय सद्गुण हे मागें
घेतां मज सुख देतां वंद्यावा साधु पुरुष हे मागें 9
सत्कार करा प्रेमें जो तुमचा साधु नर सखा याचा
मित्रातें न समर्पुनि तो स्वर्गींचाहि न रसे खावयाचा 10
तो मृतचि पुरुष मित्रीं प्रत्युपकृतितें न जो करी यत्नें
सखसख्यातें करवाया या मत्सदनांत असति जीं रत्नें
ते दोघेहि कुमार प्रांजलि वदती असें अहो तात
साधु गुणज्ञ गुरु जसे न स्वस्तरुही प्रसन्न होतात 12

---

1 सत्- महित- साधूंस मान्य असें; 2 सत्-आधार- साधूंस आधार असा 3 उत्तम गुणांच्या क्रीडेचें स्थान अशातें, 4 नामविशेष, 5 शत्रुजित्- आख्य शत्रुजित् याना वांचा, 6 त्याची साधुता 7 ज्याचे, 8 मेरुपर्वतानें, 9 मधुप कारांतें, 10 माझ्या घरांत 11 हात जोडून, 12 कल्पवृक्षही. + प्राशनानें
* अमृत

रत्नें ऋतुध्वज-गृहीं   त्या घ्याया योग्य नवनसे कांहीं
शशिकांता वालनगा   अन्याहीं तृप्ति न यनसे कांहीं १३
वा दिव्य वाहनासन-   यानांबर-भूषणादि जें कांहीं
त्याचें अस्मत्-सदनीं   या पाताळांत वस्तु तें नाहीं १४
कर्तव्य एक आहे   स्मरतां खिन्न क्षणक्षणीं करितें
विधि-हरि-हर-दत्त-वरा-   वांचूनि असाध्य सर्वथा परितें
तात म्हणे इच्छितसें   ऐकाया मी तथापि तें कार्य
म्हणति असाध्य न कांहीं   कृतनिश्चय जो तया असे आर्य
पुत्र म्हणति परिसें जें   निजवृत्त पित्या ऋतुध्वजें कथित
कथितों ज्याच्या श्रवणें   सर्वांचें हृदय होतसे व्यथित १७
ज्या शत्रु-तपोनिधिनें   आनंद सदा स्वरेश-पुरगातें[+]
गालवशत्रुजितातें   भेटे आणूनि दिव्य-तुरगातें १८
पूजेनें स्वीकारुनि   गालव बोले असें अगा राया
आलों तुज कळवाया   दुःसह निज-ताप मी अगा राया
कोणी दैत्य करितसे   नित्य उपद्रव मदाश्रमीं[3] बापा
तापा साहों न शकें   द्याया स्व-तपः क्षयावहा शापा २०
आश्रमपदास माझ्या   तापद तो मोह जेविं विश्वास
त्या सोडिला विलोकुनि   अंबर[4] होऊनि खिन्न निश्वास
तों दिव्याऽश्व उतरला   व्योमांतुनि जाहली गगनवाणी
हा शत्रुजितातें दे   तुझिया स्वयशा स्वरवा मग न यौणी[6] २२
पृथ्वी-वलयाक्रमणीं   अश्व अति समर्थ म्हणुनि हा नावें
कुवलय विख्यात यशें   होइल विश्वेंहि यासि या नावें २३
यावरि वदोनि ऋतुध्वज   होयिल हरिसाचि मान्य विश्वासे
कथि कुवलयाश्व म्हणतिल   तूं उष्या न सोडिसील निश्वास

---

१ बाल पर्वता (शशिकांत या शब्दाचें विशेषण, २ उदकसिंचनाहीं, ३ मद्-आश्रमीं. ४ आकाश, ५ आकाशवाणी, ६ कमनाई, ७ इंद्र साचि, ८ जगास, ९ श्वासोश्वास. + स्वर-ईश-पुर- देवांचा स्वामी जो इंद्र त्याचें नगर (अमरावती)

अप्रतिहत-गति वाजी पर्वत-पाताळ-गगन-जळधींत
हा रवि-दत्त मद उरीं - दे यिल न निशाचरादि-खळधींत
आज्ञा आतांचि करीं सनया तनया स्वधर्म-दक्षा या
चढुनि कुवलयीं नेजें निज-विप्रादि-प्रजांसि रक्षाया २६
राजा म्हणे अवश्य स्वसुतासि वसावयासि दे वाजी
सेवाजी विहिता तो वरि रुचली फार वा स्मृदे वाजी २७
जा जोडीं यश ऐसें नृप तनया फुल्ल करूनि गाल वदे
गाधिज जेविं दशरथा आज्ञी राज्या तसाचि गालव दे २८
राजकुमारा पावुनि न म्हणे गाधिज तसाचि गालव हा
व्यासमुनि म्हणे भव-भय- शमना सत्कीर्तिचाचि गालव हा

---

## अध्याय २

तो कुवलयाश्व जावुनि गालवमुनि सह तदाश्रमीं राहे
तों सूकररूप असुर मुनिचें धर्षण करावया पाहे १
तों गालवशिष्यांहीं त्या पाहुनि फार गलबला केला
तन्मनिम खररवें दे भय जेविं श्येनं+गल बैला केला २
अश्वीं चढोनि धांवे नृपसुत होवूनि तप्त कोपानें
त्या सूकरासि ताडी चंद्रार्धाकार-तीव्र-रोपानें ३
आत्मत्राणार्थ करी आश्रय तो मूढ दैत्य अटवीतें
फटवीतें विधिबळ ज्या रक्षिल कसि पूजिलीहि सरवी तें ४
लंघुनि महावनाचळ पळतां गांठावया खळा किटिला
दिव्याश्व तया मागें राजकुमारें धनुर्धरें पिटिला ५
निबिडांध कार-गर्ती सूकर घाली उडी तया मागें
रागें तो कुवलयही पर्शांश्चर वंचिला जसा नागें ६

१ हात, २ बगळीला, ३ अरण्यातें, ४ महावन-अचळ-मोठें अरण्य आणि पर्वत यांतें, ५ वराहाला. + श्येन पक्ष्याचा गळा.

नृपसुत मागें लागे   जेथें वधाया महा अहितें थिवर
तत्तेजासि न परि जरि   भंगद रविच्या महाहि तें थिवर ७
गेला पाताळीं कीं   त्याचें द्वारचि तसें महाबिळ तें
पाहे प्रकाश-वर पुर   सर्वत्र श्रेय साधुला मिळतें ८
करुनि प्रवेश पाहे   नृपसुत अतिरम्य शून्य परि पुर तें
स्त्रीतें विलोकुनि पुसे   उत्तर ईक्षणहि ती न करि पुरतें ९
ती स्त्री प्रवेशलीज्या   प्रासादीं सत्वरा तयामाजी
निःशंक कुमार शिरे   द्वारीं स्थापूनि तो महावाजी १०
रत्न-कनक-पर्यंकीं   पाहे तो रतिसमा नवी रमणी
अवलोकिला तिणेंही   सहसा हा स्मर-समान वीरमणी ११
पर्यंकावरुनि उठे   त्यातें अवलोकितांचि ती मोहे
जळ-पवनाद्युपचारें   स्वस्था तीची सखी म्हणे हो हे १२
होय मुहूर्तें सावध   मधुर पुसे सर्व वृत्त तो तीस
तूं कोणाची कां या   शून्य-पुरीं क्लेश-पात्र होतीस १३
वृत्त प्रेमें पुसतां   रुदती स्व-सखी-मुखाकडे पाहे
ती बोले पुरुषवरा   वृत्त क्लेशद इचें असें आहे १४
गंधर्वांचा राजा   विश्वावसु जिष्णुचा सखा आहे
त्याची मदालसाख्या   कन्या धन्या बहुप्रिया बा हे १५
जो वज्रकेतु दानव   तत्सुत पाताळकेतु या नावें
या पाताळीं वसतो   कळिकाळें ज्यासि मित्र मानावें १६
उद्यानगता हे त्या   दुष्टें हरिणी वृकें तसी धरिली
मत्प्रिय सखी मदांधें   प्रकटुनि माया तमोमयी हरिली १७
ये त्या त्रयोदशीचा   निश्चय केला इला वरायाचा
श्रद्ध श्रुनि मज नसा   हा म्हणुनि इयेंहि बा मरायाचा
भेटोनि सुरभि वदली   वत्से धरिं तूं मदुक्तिचें स्मरण

१ पक्षिश्रेष्ठ (गरुड), २ तेजाहि, ३ अवलोकनहि, ४ राजवाड्यांत, ५ इंद्राचा. ६ मदोन्मत्तें, ७ अज्ञानमयी, ८ पाताळकेतु, ९ मत्-उक्ति - माझ्या भाषणाचें. + के पर

हा दानवाऽधम तुला पावेल न वांछितीस कां मरण १९
या नरलोक-गतातें भेदील शरें करूनि जो मर्मी
तो सत्वर तव भर्ता होवुनि घालील तुज महाशर्मी २०
मी या मदिराक्षीची आळी मनात विंध्यवान् जाण
मत्पति पुष्करमाली शुंभें केला रणीं गतप्राण २१
गत्यर्थ तीर्थयात्रा करितां फिरतां मनुष्यलोकांत
कळलें हें ज्या दुष्टें केली मय्या हरूनि शोकांत २२
पातालकेतु दानव मानवलोकीं वराह-तनुधारी
मुनि-रक्षणार्थ कोणीं केला खर-बाण-विद्ध अविचारी २३
तच्छोध करूनि सत्वर आलें तें वृत्त ईस कळवाया
पळवाया चिंतेतें दुर्जन-वदनें समस्त मळवाया २४
पुससि इच्या मूर्छेचें कारण जें तेंहि सांगतें परिस
परि सत्य गमो ईस त्वद्दर्शन बहु न अमृत या परिस
हे प्रीतिमती झाली दर्शन होतांचि या तुझ्या रूपीं
कीं मानसींच हंसी रमती न रमे कदापि ती कूपीं २६
जेणें दानव वधिला त्याची व्हावी मदालसा भार्या
कार्याऽकार्य न जाणे यास्तव मूर्छेसि पावली आर्या
आलें आमरण इणें भोगावें दुःख हें इच्या भागीं
कीं चित्त तुझ्याठायीं भर्ता तो अन्य गा महाभागा २८
सुरभीचें वचन मृषा होऊंचि नये कधीं असें आहे
मी हे रूपा भुलली चित्तीं चिंता सुदुःसहा वाहे २९
इच्या प्रीतीस्तव मी आलें धांवोनि पावलें खेद
कीं आपल्या सखीच्या देहांत स्वल्पही नसे भेद ३०
जरि हे अभिमत-पतितें शुभदेवें करुनि पावती धीरा
वीरा तरि मी करित्यें तप पावाया भवाब्धिच्या तीरा

---

१ मोठ्या सुखीं, २ सखी, ३ नामविशेष (पर्वत) ४ विहिरींत, ५ हिंसा ला, ६ इच्छिलेल्या पतीस, * मनुष्यलोका मा जातें - + महाभागा असा पाठ आहे - @ लक्ष्मी

निज वृत्त सांग क्रमते येथें आलासि कोण त्या कार्यी
तूं कोण देव किंवा दानव गंधर्व नाग कीं आर्या ३२
मानुष-गति पाताळीं नाहीं रूपहि असें मनुष्याचें
मदनचि गमसी धारण जरि पुष्पाच्या नसे धनुष्याचें
म्या कथिलें तेंव जसें साधो तूंही यथार्थ सांग मला
पाताळीं शून्य पुरीं * चतुरा कार्यें प्रवेश कां गमला ३४
तो तीस म्हणे असब्ब- प्रश्नें करुनि स्थिर स्व-चित्तातें
श्रवण करीं पाठविलों मी मुन्यवनार्थ शत्रुजित्तातें ३५
मुनि-रक्षणार्थ कवची कोदंडी गालवाश्रमीं होतों
जों त्यासि म्हणें बापा तूं न मनीं गालवा श्रमी होतों
आला सहसा दैत्य स्वीकारुनि उग्र रूप कोलाचें
म्या हृदय भेदिलें निज - बाणें त्या लोपसार्तिलोलाचें ३७
होतां विद्ध पळाला त्यामागें धांवलों हयारूढ
शिरला गर्तीं प्राण- त्राणार्थी विप्रशत्रु तो मूढ ३८
माझा वाजीश्वरही शिरला गर्तीं तया खळामागें
ज्यातें न मन म्हणे श्रम झाला बहु धांवतां जळामागें
भ्रमलों तमांत बहु मी मग झालें पाहतां प्रकाशातें
तुज पाहुनि पुसिलें परि न वदुनि आलीस इच्या सैंकाशातें
तुज अनुलक्षुनि आलों या प्रासादांत कुंडले क्रमते
मी सत्य मनुष्य मधुप देवासुर पन्नगादि जे सम तें ४१
श्रवण असें होतां ती हर्षें लाजे मदालसा कन्या
वदनीं सस्मित वाहे पाहे स्व-सखी-मुखाकडे धन्या ४२
ती कुंडला म्हणे तूं वीरा वदलासि सत्य मन ईचें
तरिच तुनें अनुसरलें वरुनि सेरा वनें वसेल न नईचें
चंद्रातें पावुनियां तपेन द्युति पावती अधिक कांती

---

१ यात्लधिक, २ वराहाचें, ३ लापम-आर्ति-लोल-तपस्व्याला पीडा देण्या विषयीं अतिचंचळ त्याचें ४ स्वर्ग[illegible] , ५ मोग, ६ समीप प्रदेशातें, ७ नाम विशेष (हेमादि), ८ पुष्प, ९ [illegible], १० उदक, ११ नदीचें, १२ सूर्यतेज -
- भ्रमण * हेमचूड.

[1]क्षांति श्रेष्ठ धन्या    मूर्ति मिळे धृति भटा कविस शांती
त्यांचि अधम तो वधिला    कां मिथ्या कामधेनु बोलेल
कन्या-करग्रह करीं    हर्षे गंधर्वराज डोलेल    ४५
राजकुमार म्हणे सति    मी आहें नाथवान् कसें स्वमतें
हें कन्यारत्न वरूं    गुरु-लंघन यांत मन्मना गमतें    ४६
[2]आलि म्हणे नवद असें    होसिल न इतें वरूनि अपराधी
देवी हे दुष्प्रापा    म्हणुनि करावी कदापि न पराधी[3]
नृपसुत म्हणे बहु बरें    देवी-वचनहि अलंघ्य सांगाल
विहितचि तें कर्म करिल    न गुरुजनाचें प्रफुल्ल कां गाल
या कुवलयाश्व-वचनें    हर्षे बहु स[4]आलि कुंडला भरली
गंधर्वेश्वर-कुल-गुरु-    तुंबरुतें ते धर्वा मनीं स्मरली ४९
स्मरनांचि कळे आली    पाताळीं वत्सलत्व तुंबरुतें
धेनुहि धांवे न म्हणे    करुनि विलंब स्वैतोक हुंबरु तें
तो तुंबरु संपादी    दोघांच्या सुविधिनें विवाहातें
वंदूनि आखुवाहा    हंस-वृषभवाहसह [र]विवाहातें    ५१
तुंबरु गेल्यावरि ती    स्व-सखी तें कुंडला म्हणे आले
त्वद्‌हृदयीं सद्गुण जे    ते सर्व सुखें वसावया आले    ५२
तुज न लगे शिकवावें    स्नेहें देतें परंतु आठउनी
पति-भजनीं सुख पावो    तव मति शीतांत जेविं पाठउनी
पति परमेश्वर याच्या    भजनीं अनुकूल-बुद्धि हो भावें
लोभावें न [10]तनुसारवीं    त्यां संपादूनि कीर्ति शोभावें ५४
त्या नृप-पुत्राहि म्हणे    तुज सर्वज्ञासि काय शिकवावें
स्नेहें वदलें स्त्रीसह    [11]पुरुषार्थत्रय जपोनि पिकवावें
स्त्री योगें पुरुषाचे    साधति धर्मार्थकाम सत्या गी[12]

---

१ तितिक्षा सोसणें, २ सखी, ३ बुद्धी, ४ स-आली- सखीसह. ५ आपलें अपत्य, ६ उंदीर वाहन ज्याचें त्या गणपतीला, ७ हंस आणि बैल वाहन ज्याचें त्या ब्रह्मदेवाला आणि महादेवाला. ८ गरुडवाहन ज्याचें त्या विष्णूला, ९ मासखाले, १० शरीराच्या सुखवीं, ११ धर्मार्थकाम, १२ वाणी.

हे श्रुतिची सात्विक घे    राजस कीं ईस तामस त्यागी ५६
दोघें चिरकाळ तुम्हीं    सतत करवें पुत्र-पौत्र-सह नांदा
तुमच्या यशासि सज्जन    सेवूत चकोर ते जसे चांदा ५७
सफळ मनोरथ झाले    स्वस्थ मनें जातसें तप कराया
हेचि परम मधुर मना    माझ्या अमृतहि गमे सपक राया
स्व सखीतें आलिंगुनि    तस तितें नमुनि कुंडला गेली
हेलि[+]-स्यंदन-तुरगीं    घेउनि हृष्ट प्रियें प्रिया केली ५९
निघतांचि पुराबाहिर    ये दुर्मति तालकेतु सेहसेन
गर्जुनि म्हणे वधुनि तुज    कां मी होऊनि मुदित न हसेन
त्या वीर वरें तीं हूं    भंगुनि पातालकेतुच्या अनुजा
विषयश्री सह नेली    गंधर्व-क्षोणिजानिची तनुजा ६१
समरीं मुहूर्त मात्रें    दैत्यचमूच्या करूनि घाताते
सस्त्रीक नमुनि कळवी    वीर कुवलयाश्व वृत्त ताताते
कृत-विजयें भूपाच्या    आनंदा त्रिभुवनीं नसे जोडा
थोडा स्वप्राण प्रिय    वाटे त्या त्यापरीस तो घोडा ६३
तातांज्ञेने बैसूनि    दिव्याश्वीं सर्वदाहि साधु निघे
पूर्वार्णहींच महिवलय-    गतविश्वासी नदिष्ठ साधुनि घे
क्षिति-पर्यटन करूनिती    स्वजनीं करि अनृतवर्ष वीरमणी
क्रीडुनि रम्योपवनीं    मणि भवनीं बहुत हर्षवी रमणी
या परि वर्तत असतां    रम्याश्रम रविसुता-नटीं पाहे
ज्यांत महामुनिरूपें    मायावी तालकेतु तो आहे ६६
त्यासि न जाणुनि भेटे    शत्रुजिदात्मज नयासि तो खोटा
मोठा गोड कठिण वरि    आंत गुळें घोळिला जसा गोटा
राजसुतासि खळ म्हणे    तुज कांहीं प्रार्थना असे परिस
परि भंग तिचा न करीं    तूं दाता कल्प जो न या परिस ६८
वा धर्मार्थ करावा    यज्ञ असें आहलें असे चित्त

---

१ स्वाद रहित, २ नामविशेष (राक्षस) ३ सेनेसह, ४ वधूयाच्या पुत्रानें, ५ गंधर्व जो पृथ्वीपती विश्वावसु त्याची कन्या, ६ सूर्य कन्या जी यमुना तिच्या तीरीं, ७ शत्रुजित्-आत्मज, ८ पाषाण, ९ ऐके, १० कल्पवृक्ष.
+ सूर्यस्यंदन तुरगीं असा पाठ आहे -

परि ऋषि तपमात्र असे इतर नसे लेश संग्रहीं वित्त ६९
साहित्य दक्षिणेचें नसतां करितां वृथा कवि न यत्न
दे हें कंठ-विभूषण पितृसम दाता न तूं अविनयत्न ७०
बापा महाप्रतापा विप्रा ऽ वन-पुण्यकर्म-दक्षा या
उदकीं स्तवूनि वरुणा येतों वत्स आश्रमासि रक्षाया ७१
ग्रीवा-भूषण देवुनि नमुनि म्हणे कुवलयाश्व बापातें
सज्जुनि करीं वसतों जें कर्तव्य करीं विशंक बापा तें ७२
हर्षे कपट मुनि करी मज्जन[1] यमुनेंत शत्रुजिन्नगरीं
जाय तसा तो शोकीं पडुनि जसा जीव होय खिन्न गरीं
भेटुनि शत्रुजितातें गंधर्वेश्वर-सुतासमक्ष महा
झाला घात म्हणे यश ज्याचें दुग्धाब्धिच्या सम क्षेम हा
त्वत्पुत्र कुवलयाश्व ब्राम्हण-मुख्य-प्रजा ऽ वना मूळें
बापा मौर्यादि-वैरें दैत्यें हृदयांत भेदिला शूळें ७५
प्राणोत्क्रमणीं मज हें कंठविभूषण दिलें बळें नमुनी
तेशा समयीं घ्याया दान सदय मी न कां वळेन मुनी ७६
त्या शूद्र-तापसानीं अग्नि दिला जरि धरून देवाजी
रडला नरि दैत्यानें नेला बंधन करूनि देवाजी ७७
हें म्यां विलोकिलें बा कारण दुःसहतरोग्र तापाचें
झालें प्राप्त फळ मजहि माझ्या कलि-पूर्वजन्म-पापाचें
उत्तरकार्य करीं बा सविवेका क्षम न शोक चेराया
मज निस्पृहा कळाला हें भूषण तूं विलोक घे राया ७८
ऐसें बोलोनि पुढें भूषण ठेवुनि निघोनि तो जाय
राय क्षोणिवरि पडे प्रिय-सुत-शोकें म्हणोनि यां हाय

---

१ स्नान. २ कल्पवृक्ष ३ मागाच्यांमध्यें श्रेष्ठ अशा. ४ विचारसहिता. + विषीं
* दुःसह- तर- उग्र- ताप- मासण्यास कठीण अशा उग्रतापाचें -

राज्ञीला शोक जसा ताप तसा पापिया न रौरव दे
अंतःपुरजनचि न तो हा हा ऐसें अशेष पौर वदे ८१
प्रिय-शोकें प्राणातें तत्काळ सती मदालसा सोडी
भूप म्हणे शोच्य न व्हे हा सत्कृत सु-यश-सुगतितें जोडी ८२
मुनि-रक्षणासि जैसा तैसा न प्राण-रक्षणा जपला
खपला अपलायनकर बहुधा बहुजन्म साधु हा तपला ८३
जैसी मदालसेची कोणाचीही असी प्रसू नाहीं
हे पूजिली सुरांहीं देवी दुर्गा जसी प्रसूनांहीं ८४
राज्ञीहि उठोनि म्हणे श्रित-रक्षक विष्णु-चक्र वत्सा जें
तें तुज धन्य म्हणेल स्वर्गीं त्रिदशांत शक्रवत् साजें ८५
जरि गेलासि न पुसतां तरि वत्सा मी करीन कां रुसवा
मरुनि रणीं त्वां माझा केला बा धन्य या जगीं कुसवा ८६
वत्से मदालसे हा तुजसह तव कांत रुचिर नांदावा
चांदा वाटे प्रियसख यासीं द्विजपाळ करिल कां दावा ८७
सस्त्रीक नृप विवेकें क्षम जाळायास होय देहातें
दाहोत्तर स्नुषेतें त्या पुत्रातेंहि तोय दे हातें ८८
यापरि दुःसह-शोकीं बुडवुनि महिपतिस मोहिस मायावी
हर्षे फार दया कां त्या करितां घात अहिसमा याची ८९
तो यमुनेंतूनि निघे अक्रूर म्हणे कार्य करुनि मी आलों
झालों कृतकृत्य तुवां केलें साहित्य बहु सुखें धालों ९०
ऐसें बहु मधुर वदे दे आज्ञा त्यासि नमुनि हरिवरि तो
बसुनि पुरा ये ज्यातें स्वर्गीं पाहोनि भीति अरि वरितो

---

१ शोक करण्यास योग्य. २ माता. ३ पुष्पांनीं. ४ आश्रितांचें रक्षण करणारें ५ देवांत. ६ कुस. ७ चोज्यावरि. + पलायन न करणारा ∗∗ दाह-उत्तर-जाळल्यानंतर.

## अध्याय ३

पाहुनि राजसुतातें बहु आशी बहु करूनि गौरव दे
विस्मित होवुनि भेटे भद्रं भद्रं समस्त पौरें वदे १
विस्मित होवुनि वंदुनि वृत्त पुसे कुवलयाश्व तातातें
कथिति गळां पडुनि रडुनि जें दारुण वृत्त तात माला तें २
चित्तीं नृपपुत्र म्हणे मजकरितां त्यागिला स्वकाय जिणें
तीच भली धिक् कठिना मातें हें श्लाघ्य होय काय जिणें ३
काय प्रत्युपकार प्राण-त्यागें स्त्रियांस हे युक्त
त्या साध्वीच्या नरिणा-पासूनि होयिन मरोनिही मुक्त ४
रिपु हर्षतील रडतां माझा तत्काळ भंग करितील
हरितील राज्यपद मग बहु माता तात ताप वरितील ५
जीवित ताताऽधीन त्यागावें म्या कसें पराधीनें
यापरि विचार करितां झाला शोकांतही बरा धीनें ६
उत्तरकार्य करी मग नृपसुत डोळे करूनियां ओले
म्या स्त्री मदालसान्या नवरावी निश्चयें असें बोले ७
स्त्रीभोग त्यजुनि असे शोकाग्नीच्या वहात ओहेतें
त्या कार्य करीसा क्षमे कोणाचाही न हात आहे तें ८
तो उर्वशीहि म्हणतो नलगे व्हावी मदालसा मातें
ओसणतो प्रियसखहो किति कष्टा या वदाल सामातें ९
व्हावी मदालसेची प्राप्ति पुन्हा हेंचि एक तत्कार्य
सत्कारावा म्हणसी तरि होयचि तो सुसाधु-सत्कार्य १०
कार्य कुवलयाश्वाचें दुर्घट लोकेश्वरांसही वा हें
मग कोण समर्थ जगीं त्यासि म्हणाया अभीष्ट तूं लाहें

१ आशीर्वाद. २ पुरवासी लोक. ३ बांचणें. ४ बुद्धीनें. ५ ज्वाळेने. ६ समर्थ.
७ कल्याण.

अश्वतर म्हणे फणिहो जरि जन जाणुनि अशक्य-कर्मातें
न करितिल अनुद्योगें पावतिल न कार्य-सिद्धि-शर्मातें
पुरुषें आरंभावें कर्म न पौरुष कदापि सोडावें
कर्म-फळ जसें दैवें स्पष्ट तसें पौरुषेंहि जोडावें १३
या स्तव यत्न तसा मी करिन जसें सिद्ध होय हें कार्य
म्हणती सर्वार्थांची सिद्धि असें निश्चयीं असे आर्य १४
ऐसें बोलुनि फणिवर जें श्रेयस्कर मनांत आणी तें
प्लक्षावतरण-तीर्थीं तुहिन[+]-नगीं जाय शरण वाणीतें १५
दुष्कर तप करुनि करी अश्वतर श्री-सरस्वती-स्तवन
जीचा प्रसाद वृद्धि ज्ञाना दे पावका जसा पवन १६
प्रणवादि जगन्मूर्ते कारुण्य-निवास-मानसे वाणी
माते तुज नत जो त्या विधि-विष्णु-शिवासमा नसे वाणी[※]
देवी भेटोनि म्हणे झाले जे भक्त शिष्टवर मागें
अश्वतरा तदधिक तूं घे देतें सर्व-इष्ट वर मागें[४] १८
अश्वतर म्हणे माते भ्राता कंबळ सहाय दे आधीं
दोघांसि गानविद्या अतुला देऊनि कीर्तिला साधीं १९
श्रीविष्णु-प्रभु-जिह्वा वाणी दिधलें असें स्वरें वदली
पदलीना बहु निववी ती चित्कर्पूर-पूरिता[५] कदली[६] २०
श्रीवाणी वर देवुनि जातां तत्काळ स्ववर तो फळला
गान-प्रकार निरुपम अश्वतरा कंबळासिही कळला २१
मग जावुनि कैलासीं सांबा तद्भक्तिचें पद भ्राते
यश गावुनि आराधिति जोडाया तत्कृपा अदभ्रा ते २२
मध्यान्ह-निशा-संध्या- समयीं सप्रेम नित्य यश गाती
चिरकाळें भक्तांची कल्पलता त्यासि होय वशगा ती २३

---

१ पराक्रम. २ आहे. ३ सरस्वतीतें. ४ माग. ५ चित्-कर्पूर-पूरिता-चैतन्यरूप कर्पूरानें पूर्ण असी. ६ केळ. + हिमाचळीं. ※ कमीपणा.

कुतुकें सर्वार्थास प्रभु जो वीणार वासेवाद्यांस
होय प्रसन्न सेवुनि त्यांच्या वीणारवास वाद्यांस २४
दे दर्शन देव वदे घ्या वर जैसा यशाचिया गानें
होतों प्रसन्न अहिहो नच योगानें तसाचि यागानें २५
कंबलसह अश्वतर प्रभुतें वंदुनि म्हणे जरि वरातें
देतोसि कुवलयाश्वा द्यावें स्त्रीरत्न जें मृत हरातें २६
वय-रूप-स्मरण तिचें तेंचि असो व्यक्त योगिनी धंन्या
हे अधिक योगिमाता व्हावी माझी मदालसा कंन्या २७
ईश्वर सांगे भक्षीं श्राद्ध करुनि पिंड मध्यम व्याळा
होयिल तसीच ती तव- मध्यम-फण-जा मदालसा बाळा
भक्तें वंदुनि गेले हर्षें पन्नेग रसातळीं गेहीं
शिव-दर्शन-वर-लाभें ज्यांच्या रोमांच दाटले देहीं २९
अश्वतर श्राद्धांतीं मध्यम पिंडासि आदरें भक्षी
तत्काळ मध्यम-फण- श्वास-प्रभवा मदालसा लक्ष्मी ३०
अश्वतराला झाला जो तो आनंद काय सांगावा
भक्तचा प्रभुभक्तांचा महिमा आम्हीं सदा न कां गावा
कोणासहि न कळो दे ठेवी अंतःपुरांत बाळेतें
जपति स्त्रिया बहु तिनें जेविं स्वर्वृक्ष-पुष्प-माळेतें ३२
मग तो म्हणे सुतांतें कां स्वगृहा कुवलयाश्व आणाना
साधु सखा उपकारी पूज्य असें कां मनांत जाणाना
नित्य वायाचि सुदियसीं मित्राच्या स्मरण धरुनि आनयनें
भाग्याया अतितृषितें वाट पाहातात करुनि आ नयनें
प्रातःकाळीं भेटुनि ते आधीं सांगती कथा भव्या
मग अस्मदाश्रमातें ये ऐसी गोष्टि काढिती नव्या ३५

---

१ प्रसवणार. २ इंद्रादिकांस. ३ सर्प. ४ आणण्यानें. ५ अस्मत्-आश्रम-आमच्यागृहास. ६ नूतना.

नृपसुत म्हणे सखेहो या वाक्यें फार वाटतो खेद
तुमचें हें सर्वस्व प्रिय हो कां आज कल्पितां भेद ३६
सत्य सखेहो माझे परम हित तुम्हीं बहिश्चर प्राण
या मज दैव हताच्या झाला हृदयांत भेद हा बाण ३७
ऐसें वदतां अहिसुत ते तांताज्ञा तयास कळवीती
तो नमुनि म्हणे झालों धन्य कुशळ गुरुदया सकळ कीर्ती
सत्वर चला सखेहो तातज्ञाश्रुति[2] अतिक्रमिल कोण
शौण[3] न होऊं द्यावा तिळमात्रहि तात-दृष्टिचा कोंण[4] ३९
बोलुनि असें तयांसह नगराबाहिर निघोनि तो पावे
द्रुत गौतमीस कीं नच उशिरें ते तातपाद कोपावे ४०
त्या गौतमींनदींत व्याळ-नरेश्वर-कुमार ते शिरले
जींत स्नात-सकळ-जन- दोष ज्वाळेंत शलभसे जिरले ४१
मानी कुमार चित्तीं तटिनी[5]पारीं स्व-मित्र-सदनातें
नेती नदींत दोघे फणिसुत ते त्या प्रसन्न-वदनातें ४२
शिरवुनि सरितेंत बळें आकर्षुनि सर्पपुत्र मित्रास
नेती पाताळीं ते परि पावे तो न लेशहि त्रास ४३
निजलोकीं निजरूप प्रकटिति मग ते फणींद्र-सुत दोघे
पाहुनि हर्षे हांसे तत्सुगुणानें गुणज्ञवर तो घे ४४
प्रेमीं नचळे गातां जैसा नारद महातपा ताळीं
अश्वतर-प्रासादीं गेला कुतुकें पाहात पाताळीं ४५
ते त्या कथिती स्वपिता अश्वतर व्याळपाळ दावूनीं
तो कुवलयाश्व वंदी विनयें चित्तांत तात भावूनी ४६
सुत-मित्रातें पाहुनि तो अहि उतरे वरासना वरूनी
भेटे माथा हुंगी कुरवाळि तया करास नावरुनी ४७

---

१ प्रसवणारी. २ तात-आज्ञा-श्रुती- बापाची आज्ञारूप वेद. ३ लाल. ४ कोन. ५ गौतमी नदीच्या पैलनी

तो त्या म्हणे म्हणावें साक्षात् तातें जसें चिरं जीव
गुरुजन-मन सुगुणांहीं बहु रंजविसी असेंचि रंजीव ४८
सुगुण तुझे आइकतां या पुत्रांच्या मुखें हृदय रमलें
आणविलासि पहाया वत्सा तुज पाहतां सुदिन गमलें
जो पुरुष गुणी त्याचें जीवित तें श्लाघ्य होय लोकांत
जीवंतहि मृत अगुणी कीं बुडवी स्वजन-चित्त शोकांत ५०
गुणवान् सुख वाढवितो साधुमनीं रिपुजनांत तापातें
पापा तेविं अपत्या अगुणा नभजति नसोचि वापा तें ५१
देव पितर विप्र अतिथि अर्थी जे विकळ मित्रजन वा हे
गुणि-जीवित चिर वांछिति वाहे हा यांसि भाग यश लाहे ५२
वत्सा गुरुजन-रंजन- रत-हृदया भव्य-गुण-गणा वासा
नृक्षियाठायीं जो जो तो तोहि गुणांत गुण गणावासा ५३
ऐसें वर्णुनि फणिवर पुत्रांसि म्हणे उठा सखा न्हाणा
आणा स्वन्न[४] मधु-अशन करवा पूजा बहिश्वरा प्राणा ५४
राहो वालायाची यासीं आहे कथा पुनरपि हिता
हृदयीं रहस्य-वार्ता राहो देखिल नहा सुनर पिहिता ५५
विनयें नवदे किमपि प्रेमें परि वाक्य मान्य तो करि तें
त्या पूर्ण करूं पाहे अहि न असो दे समर्थ[+]-तोक रितें ५६
स्नानाऽशनादि करवुनि करुनि प्रेमें सभेंत सुतसहित
अश्वतर वसे वसवुनि जवळ नृपतनय वदावयास हित ५७

---

## अध्याय ४

रवि हर्षवूनि लावी सोडाया जेविं कुवलया[६] श्वास

---

१ बहु काळ. २ वांच. ३ गुणरहित अपत्य. ४ सु-अन्न-उत्तम अन्न. ५ आच्छादिता. + समर्थाचें बालक. ६ पृथ्वीवलया किंवा कमला.

करि सुप्रसन्न फणिवर पुण्यकथा कथुनि कुवलयाश्वास
मग राजसुतासि म्हणे वत्सा निःशंक सांग तें पावें
कोणें सुपदार्थें तुज सुखवावा वत्स काय अर्पावें २
आसन वाहन अंबर आयुध किंवा सुवर्ण मणि कांहीं
दुर्लभ वस्तु वरावें घ्यावें म्या जें दिजे न अणि कांहीं ३
नमुनि ऋतुध्वज विनवी पाताळीं तात तूं महीवरि तो
काय उणें सर्व सुखें जीं जीवसितृप्त तो महीं वरितो ४
रत्नादि सर्व पुष्कळ त्या तात-गृहीं जगीं असेना तें
येथेंहि विपुळ बापा घ्यावें द्यावें असें असे नातें ५
कार्यहि नाहीं कांहीं याहीं बाहीं यथेष्ट आहेत
अर्थी पावति न मनीं भोगावें भूषणादि हा हेत ६
जें दुर्लभ वांछावें पावाया धरुनि आदरा जीवें
झालें प्राप्त मज शिरें स्पर्शुनि तव भव्य पादराजीवें ७
प्रेमें फणिवर्य म्हणे वत्सा कनकादि जरि नको असु
जें तव हृदयास बहु प्रीतिप्रद तेंचि माग तूं वस्तू ८
नृपपुत्र म्हणे झालों स्पर्शास तुझ्या मनुष्य मी पात्र
अंतर्बाह्य निवालें अमृतस्नानें जसें तसें गात्र ९
द्यावा अवश्य वर हें चित्तीं तरि हेतु सर्व-शर्मांचा
हृदयांतूनि न जावा माझ्या संस्कार पुण्यकर्मांचा १०
दिव्यांगराग रत्नें स्त्री-सुत-संपत्ति-गीत-वाद्य असें
हें सर्व सुकृत-तरु-फळ जें होणें मुदित विविध-भोग-रसें
सर्प म्हणे सत्य वदसि हें तुज दिधलें तथापि जें कांहीं
दुर्लभ नरलोकीं तें माग किमपि कठिण वा मला नाहीं १२

---

१ तृप्तकरावें. २ उत्सववान्. ३ चरणकमळें. ४ असो. ५ दिव्य-अंगराग-दिव्यगंधाची उटी. ६ आनंदित.

या वचनें बहु कोंडे    आग्रंह करितां उगाचि तो राहे
पाहे संकोचाचा    भर मित्रांच्या मुखांकडे पाहे    १३
फणिसुत म्हणती ताता *अहितें कथितांचि शोकदा वार्ता
याची दयिता मेली    होवुनि अत्यंतशोकदावार्ता    १४
गंधर्वेश्वर-कन्या    ती सुतनु मदालसा तदन्या या
नरुचे हा ताहिरहें    झाला ताता असा पद न्याया    १५
मुक्ति मुमुक्षूस जसी    या तीच स्त्री रुचे नको कांहीं
श्रम याच्या प्राणांहीं    विरहें धरिला असा न कोकांहीं १६
बापा घडेल तरि या    तीच समर्पूनि तूं पुरीव रती
भोगवती यास नको    अलकाहि तिच्याहि जी पुरी वरती
अश्वतर म्हणे सुतहो    मृत-दर्शन जें सुरांसही जड तें
स्वभावांचुनि किंवा    मायेवांचुनि कसें मुला घडतें १८
नृपपुत्र भीड सोडुनि    बोले शोकाभिधा अळासातें
धिक्शठाया दावावी    कसितरि ती एकदा मला तातें १९
दयिता मदालसा ती    ताता मायामयीहि दाखवितां
मजवरि परमानुग्रह    जेविं सुधा ज्वर-हतासि चाखवितां
अश्वतर म्हणे माझें    विपुळ नसे हृदय या नव्हा मांया
अभ्यागत बाळहि गुरु    वांछिसि तरि तूं सुखें पहा मोयर
ऐसें बोलुनि सदनीं    निजली होती मदालसा दुहिता
ती आणुनि तो दावी    सुतमित्राच्या करी असा सुहिता
स्थित करुनि पुसे नवमन    जीच्याठायीं सदा असे लोल
ती हे मदालसा कीं    अन्या वत्सा पहा खरें बोल ॥ २२
अवलोकितांचि लज्जा    सोडुनि सहसा उठे प्रिये आली

१ आग्रहानें. २ अत्यंत-शोक-दाव-आर्त-अत्यंतशोकरूपवणव्यानें पीडिता असी. ३ नामविशेष (चक्रवाकपक्षी) त्यांहीं ४ नामविशेष (स्वर्गनगरी) ती. ५ नामविशेष (कुबेरनगरी) तीहि ६ कोठितातें ७ वत्स वा ८ आग्रहयास ९ कपट १० चंचल ११ हे सखी + शोकनावांच्या

ऐसें म्हणत निजकडे आलिंगायास धांव तो घाली २४
नागेंद्र विनोद करी रे वत्सा मजकडे पहा काय
भ्रमसी हे माया कीं योग्य स्पर्शावया न हा काय २५
करितां स्पर्श नराहे माया दूरूनि मात्र वा पाहें
आलिंगनें न निवविल पळ विघा-रचिल-गात्र बापा हें
यापरि वदुनि निवारण करि जेव्हां पन्नगेंद्र तो हातें
हाय कुवलयाश्व म्हणे तत्काळ पडे धरूनि मोहातें २७
मोहे अश्वतराचे पुत्राच्या जेंवि तान-मन घातें
सावध करिशी तयनें षवनें पुत्रासमेत अनघातें २८
करुनि विनोद क्षणभरि तो पन्नग सर्व-साधुराय कवी
अर्पुनि कन्या प्रेमें वृत्त सकळ तें तयासि आयकवी २९
कांतेतें पावुनि तो बहु हर्षे कुवलयाश्व करि नमनें
प्रार्थुनि म्हणे फिराया ऋण चरण-स्मरण नित्य करिन मनें
मग चिंतितांचि आला कुवलय हयवर चढे तयावरि तो
ये सस्त्रीक स्वपुरा सद्गुण जन पुन्हा महोदया वरितो ३१

---

## अध्याय ७

येवुनि पुरासि वंदुनि तातातें सर्व वृत्त तो कळवी
पळवी शोक पळांत स्व-यशें शांभव-जनानने मळवी१
वा हो देह यशासि न मोलाच्या हा तसा सरा सोसू
रुचिर असा म्हणति असे शिरिं ठेवुनि हात सासरा सासू२
होय पुरांत महोत्सव वांटिति जन कणक शर्करा जीवां

१शरीर. २धंड उदकानें. ३सप्राण +शंभुजनाचीं मुखें ++निष्पापातें.

तो वासर+ बहु स्फुरवी त्या पौरां जेविं अर्क राजीवां[1] ३
वर्णिति अप्सरा किति शत्रुजिता किति ऋतुध्वजासि कवी
त्यानें मदालसा-व्रत निजभाग्यहि गा असें प्रजां शिकवी
मंदाकिनींत जैसा नाणें तापा महागज न कांहीं
हा नृप तैसा वरिलें स्फुरत इतरांच्या महा[2]गजन कांहीं ५
स्वर्गासि शत्रुजिन्नृप परिपाळुनि पुत्रवत् प्रजा गेला
मग कुवलयाश्व राजा पडुनि गळां प्रकृतिनीं** वळें केला
पोटीं मदालसेच्या शुभलग्नीं प्रथम होय सुत राजा
संसृति[3] सती[4]सहाया नीतिरता सर्वकाळ सुतराज्या ७
प्रेमें विक्रांत असें नाम ऋतुध्वज तया सुता देवी
तेव्हां ती हास्य करी ज्ञानामृत-निधि मदालसा देवी
उल्लापन-छळें[5] ती ज्ञानाब्धि मदालसा स्वतोकातें
बोधी न सांपडाया इतरांपरि संसृतीत शोकातें ९
ताता शुद्ध असासि तूं सर्वगत अनादिनिधन निष्काम
आतांचि कल्पनेनें केलें विक्रांत हें तुला नाम १०
तूं नामरूप-वर्जित मायेनें विश्व-कल्पना-गेह[6]
स्नेह नसे विषयांचा पंचात्मक[7] हा तुला नसे देह ११
अन्नें उदकें भूतें वाढति तुज वृद्धि हानि या नाहीं
तूं एक अविद्येनें दिसती भूतें जगींच नाना हीं १२
स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकासि खेळवितां
देवी धजो सुदुर्मिळ थोरांसि सहस्रकल्प मेळवितां १३
जन्मापासूनि बोधुनि केला विक्रांत पुत्र सुज्ञानी
वांछीना गृहधर्म[8] स्तविला बहु नारदादि सुज्ञानीं १४

१ कमळांना. २ दुर्भिक्ष, दुष्काळ. ३ संसार. ४ पतिव्रता सहाय ज्याला-अशा. ५ शब्द बदलल्याच्या कपटानें. ६ जगत्कल्पनेचें गृह असा ७ पंचभूतात्मक. ८ गृहस्थाश्रमधर्म, + दिवस. ** प्रजांनीं.

त्यावरि सुबाहु ऐसें नाम स्थापी द्वितीय-तनयानें
हांसे मदालसा जरि मानवती आद्य सुत जन यातें १५
त्यासहि बाल्यापासुनि बोध करी ती मदालसा सुमती
अहिता संसारावरि त्याचीही बुद्धि जाहली रुसती १६
मग तिसरा सुत होतां पुर झालें अद्भुतोत्सवा धाम
त्यालाहि शत्रुमर्दन ऐसें ठेवी पिता स्वयें नाम १७
त्या नामें जन हर्षे तेव्हांही बहु मदालसा हांसे
दे आत्मबोध त्यासहि जो तोडी विषय-वासना-फांसे १८
नाम चतुर्थ सुताचें जों योजी कुवलयाश्व तों पाहे
ती हसित-मुखी देवी बहु पहिल्याहूनि जाहली आहे
नृपति पुसे वद कारण हास्याचें जें मना तुझ्या येतें
नाम चतुर्थ सुताला ठेवावें त्वांचि आजि जाये तें २०
नामें बरवीं केलीं विक्रांत सुबाहु शत्रुमर्दन हीं
राजसुतातें उचितें कुशलें घालावया जनास महीं २१
ती साध्वी पतिस म्हणे ओरख्या आली मनास माझ्याजी
ती तुमच्या आज्ञेनें ठेवितसें या सुतासि राजाजी २२
हा सुत अलर्क नामा या वंशीं जेविं दीप ओकांत
धर्मज्ञ साधु सद्गुण होइल विख्यात सर्व-लोकांत २३
हास्य करूनि भूप म्हणे सुज्ञे दयिते अलर्क हें नाम
गमतें अबद्ध याचा वद अर्थ सुगंध धार्य तें दाम २४
राज्ञी म्हणे अहोजी हे व्यवहारार्थ कल्पना जाणा
युष्मत्-कृत-नामाची कथितें चित्तीं निरर्थता आणा २५
जे भातते म्हणति जन पुरुष व्यापक तया घडे न गती

---

१ गृह २ उत्साहीं ३ नाम ४ गृहांत ५ धारण करावयास योग्य.

केली विक्रांत असी   आख्या जी सार्थका कसी मग ती
पुरुष अमूर्त[1] तयातें   काय म्हणावें सुबाहु पंडित हो
या सुविचारें दुसरें   नाम सुताचें कसें न खंडित हो २७
तिसरें हि शत्रुमर्दन   हें नाम व्यर्थ सर्व देहांत
एकचि पुरुष बहु दिसे   जेसा आदर्श-जडित-गेहांत[2] २८
अरि कोण मित्र कोण   स्वामी सुविचार करूनि सांगावें
सुतनाम शत्रुमर्दन   हें मग सार्थक म्हणोनि कां गावें २९
भूतांहीं भूतांचें   मर्दन तत्वज्ञ जाणतात असें
पुरुष अमूर्त तयाचें   मर्दन बोला बरें घडेल कसें ३०
सद्व्यवहार[3] घडावा   म्हणुनि असन्नाम[4] कल्पिलें जातें
ऐसें असतां म्हणतां   कां व्यर्थ अलर्क नाम जें यातें ३१
त्या तथ्य-वादिनीचें[5]   श्रवण करूनि वचन मानवेश तदा
वाक्या सरस्वतीच्या   चतुरानन तेविं मानवे शतदा ३२
जेविं तिघे सुत झाले   चवथाहि तसा अलर्क तो व्हाया
बोधाया ती लागे   तदऽविद्यामलिन[6] हृदय शोधाया ३३
क्रुद्ध कुवलयाश्व म्हणे   जीतें स्तविती समस्त संत तितें
मूढे हें काय करिसि   माझ्या बुडवावयासि संततितें ३४
मत्प्रिय करणें हें जरि   तुझिया चित्तीं असेल हा तनय
योजीं प्रवृत्ति मार्गीं   नच होवु हातधर्म[7] हा तनय ३५
परिपालन प्रजांचें   सिकवि अनुष्ठान सर्व-धर्मांचें
हें कारण देवांच्या   पितरांच्या होय तृप्ति-शर्मांचें ३६
ती पतिच्या आज्ञेनें   तैसाचि करी सुतासि उपदेश
वत्सा पितृ-मन शीलें   रंजिव हो साधुभक्त सुपदेश[8] ३७

---

१ अप्रत्यक्ष. २ आरशांनीं युक्त जें गृह त्यांत. ३ सत्-व्यवहार-खरा व्यवहार. ४ असत्-नाम. ५ खरें भाषण करणारीचें. ६ तत्-अविद्या-मलिन-त्याचें अज्ञानानें मलिन झालेलें. ७ हाकिला धर्म ज्याणें असा. ८ सु-पद-ईश-उत्तम पदाचा स्वामी

मित्रांवरि उपकार द्वेषि-जनाचा करीं विनाश रणीं
भूत-हित-प्रेम-भरें विप्रार्चन सर्वदा स्वयें शरणीं ३८
स्वप्नींहि परस्त्रीनें नशिवे ऐसें करीं अधीन मन
गो-विप्राऽश्वत्थांचें न चुकों द्यावें तुवां कधीं नमन ३९
श्रीविष्णु-ध्यान करीं नित्य श्रीशंकरा सदेशा ध्या
नरसिंह भवीं अभेरें भजतां श्रीशा शिवा सदेश[3] ध्या ४०
शरणागत-गो-विप्र- त्राणार्थ रणीं शरीर सोडावें
जोडावें पुण्य यश ह्मणि-श्रुतिवच कधीं न मोडावें ४१
विधिवत् सर्व सॅब[4] करीं विप्रांतें विपुल वित्त दे ह्मणे
वृद्धपणीं सोडघनीं करुनि तपें शुद्ध चित्त दे ह्मणें ४२
यापरि उपदेश करुनि देवीनें तो कुमार कवि[6] केला
मातेच्या शिक्षेला वश होय जसा सरम्य कोंविकेला ४३
झाला प्रौढगुणी गग अनुरूपा[5] करुनियां दिली मंहिला[8]
ती प्रसवे स्नुतरत्नें जीं योग्यें भूषवावया महिला[9] ४४
जाणुनि धर्म-नयज्ञ क्षिति-रक्षा-क्षम विनीत शुचि तातें
अभिषेक करुनि दिधला निज-राज्य-पदाऽधिकार[10] उचितातें
वृद्धपणीं स्नविवेकें गमले बहु भोग ते सपंक राया
जाया[11] तपोवनातें आंद्यासख तो निघे तप कराया ४६
तेव्हां मदालसा ती उपदेश करी नया[12] स्नुता चरम
वत्सा दुःख शमाया तुज एक उपाय सांगत्यें परम ४७
तुज बोधाया बा या सुह्मागर्भी असे विटि कवीला
ती कथिल तें करावें नाप गुरूक्तें नसेचि रिकवीला ४८
लिहिलें या मुद्रेंत व्यसनीं वत्सा बरें पहा वाच

१ सत्-आराध्य-साधूंनीं आराधन करण्यास योग्य असा. २ स्त्री सहवर्तमान-असा. ३ ज्ञानकर. ४ यज्ञ. ५ पुष्कळ. ६ रुगामेला. ७ योग्या. ८ स्त्री. ९ पृथ्वीला. १० स्वाररहित. ११ बायकोसोबतीण ज्याला असा. १२ शेवटल्यासहता

तेंचि करीं गुरु-वचनीं विश्वास तुझा सदा रहावाच
ऐसें स्नुतासि सांगुनि देवुनियां कनक-मुद्रिका आंगी
त्या वीलाढ्यासिं पुसुनि गेली जोडावया तपोराशी ५८

---

# अध्याय ६

चिरकाळ अलर्क करी धर्मनयें कुवलयाश्वसा राज्य
भाज्य विषय सेवुनिहि न तृप्त अनळ जेविं भक्षितां आज्य
ब्रम्हज्ञ सुबाहु म्हणे यालाहि मलाहि हे नव्हे युक्त
संसृति-पाशापासुनि बंधु करावाचि सर्वथा मुक्त २
ऐसें चिंतुनि योगी जाय शरण बंधुशत्रुतें आधीं
त्यांस म्हणे काशिपते यश घे मत्कार्य तूंचि हें साधीं ३
राया सुबाहु नामा मी जाण मला मदालसा तनुज
आतां राज्य करावें त्या जो करितो अलर्क तो अनुज ४
तें कार्य यशस्कर कां अभिमानी काशिराज परिसेना
शरणागत राज्यपदीं स्था राया शीघ्र सिद्ध करि सेना ५
दे राज्य अग्रजातें ऐसें सांगोनि पाठवी दूत
तो अरिशासन मानी मानी न अलर्क मनुज-पुरुहूत
भेटोनि अग्रजानें मजला स्वमुखेंचि राज्य मागावें
लागावें न परमतिस त्याही अरिशासनीं न वागावें ७
तोंहि सुबाहु म्हणे मी क्षत्रिय कां दे असें म्हणेन मुखें
सामें देत नसे तरि देयिल दंडेंचि सर्व राज्य सुखें ८

---

१ आशिर्वाद. २ अभिमानी. ३ मनुष्येंद्र.

योगिवर सुबाहु बळें युद्धार्थ विरोध वाढवी राजा
जागें करावया त्या प्राप्त अहंकार वाढ वीरा ज्या ९
चतुरंग सैन्य पुष्कळ मिळवुनि काशीश विजय भावुनिघे
भासे घाया परिभव परि भवें वारावयासि भावु निघे १०
सामाद्युपाय योजुनि वश करि सामंत काशिपति सर्व
आक्रमुनि राष्ट्र पुरहीं तुरवी लेशहि अलर्क-नृप-गर्व ११
प्रतिदिन वीरजन-क्षय होय धनक्षय अलर्क असहाय
आंत गडबडे बाहिर मात्र म्हणे दे न वीररस हाय १२
त्या परम संकटीं तो स्मरता झाला मदालसा-मुद्रा
क्षुद्रा उपमा अन्या त्या ती गंगाजशी हिता रुद्रा १३
पूजी निजमातेची ती मुद्रारूपिणी त्या साची
याची अभय वरातें रोमांचित-देह होय तो वाची १४
संग त्यागाया जरि न त्यजवे साधुसीं तरि करावा
कीं संगाचें ओखद संत मनीं बोध हा हित धरावा १५
काम त्यागावा जरि न त्यजवे सर्वथा तदीय-जया
तरि तोचि मुमुक्षेप्रति करिजे कीं तीच होय ओखद या
हा ज्यांत अर्थ ऐसें श्लोकद्वय अंगुलीयकीं पाहे
ज्याणें स्पष्ट मुमुक्षा- योगेंचि श्रेय या भवीं आहे १६
सत्संगेंचि मुमुक्षा- प्राप्ति जना होय हें मनीं आणी
खाणी तच्चिंता-विष- वल्लीतें ती मदालसा-वाणी १८
ज्याच्या संगें होय प्राप्त मुमुक्षा जिणें भवा अंत
संत-स्नानभद्या- समयीं मज कोण भेटलो संत १९
ऐसें चिंती जों तों श्री दत्तात्रेय संत ये ध्यानीं

---

१ अधिक. २ जन्म. ३ मांडलिक राजे. ४ त्याका मजया. ५ संसारांतून सुटण्याच्या इच्छेला.

ज्ञानींद्रा त्या जाय   क्षिप्र[1] शरण तो तयाचिया स्थानीं २०
जी अज्ञान[2]-तमोघ्नी   प्रभुदृष्टि पडे तदा नृपावरि ती
शरणागता तयानें   तत्काळचि जाहली कृपा वरती २१
वंदुनि म्हणे प्रभो मी   शरणागत मुख्य तूं शरण्यांत
रक्षीं दुःखीं पडलों   मृग जेविं दवा-कुळा[3] अरण्यांत २२
श्रीदत्तात्रेय म्हणे   बा वद तूं कोण दुःख तें काय
घाय दिसेना देहीं   हो सावध ऊठ म्हणसि कां हाय २३
ऐसें विश्वगुरु पुसे   चित्तांत अलर्क जों विचार करी
जाणे मी सच्चित्सुख   एक इतर कोण भिन्न कोण अरी
देहादि इतर सकळें   विकळें एणें न मीं सकळ विकळ
देहाभिमान नसतां   ताप उठुनही बुधा न कळवि कळ
तो श्रीदत्तासि म्हणे   मज दुःख खरें विचारितां नाहीं
जीव असम्यक्[4] दर्शी   संसारीं सुख न पावती कांहीं २६
पुरुषाच्या चित्तानें[5]   जेथें जेथें महत्व बा होतें
तेथुनि तेथुनि दुःखें   आणुनि देतें समर्थ आहो तें २७
गृहकुक्कुटासि खातां   मार्जारें जेविं दुःख होय जना
तेविं न ममता-शून्या   चटका[6] कीं मूषका स्वभक्ष्य धना २८
म्हणुनि न दुःखी न सुखी   कीं प्रकृतिहून पाहतां पर मी
कळलें असें विचारीं   या आतां क्षणहि राहलों[7] परमीं[+]
त्यातें श्रीदत्त म्हणे   जें तूं वदलासि सत्य तें बा गा
दुःखाचें कारण मम   निर्मम सुखाचें नृपा महाभागा ३०
हें ज्ञान मत्प्रसादें   झालें तुज साधुवृंद या गातें
मम हा प्रत्यय शाल्मलि-   तूळ[9] उडविला सदूर ज्या वातें

---

१सत्वर. २ अज्ञानरूप अंधकाराचा नाश करणारी. ३ दव-आकुल-पणव्यानें-व्यापिलेल्या. ४ चांगलें न पाहाणारा. ५ पुरुषाचें चित्त. ६ नामविशेष (पक्षी) ७ माहें. ८ नकेमारो. ९ सावरीचा कापुस. + ब्रम्हीं

सत्संग-शाण-निशितें विद्याशस्त्रेंकरूनियां ज्यांहीं
ममताद्रु तोडिला बा नाहीं भय या भवीं तयां कांहीं
अमना ममता त्यजितां आत्मसुख प्राप्त होय गा राजा
लाजति विरति निपट सुख ध्याया नेणोनि सोय गा राज्या ३३
राजा भूतेंद्रियमय हें स्थूळ न तूं न मीहि बा समज
क्षेत्रज्ञ क्षेत्राहुनि पर कथितों बहु अभीष्ट दास मज ३४
इषिकजळ मशकोदुंबर यां एकत्वीं जसा पृथग्भाव
ऐसा क्षेत्रात्म्याचा जाण अलर्का धरीं बरा भाव ३५
इत्यादि दत्त बोधी शोधी मन कथुनि साधुयोगातें
शरणागतासि तारी कविवृंद उगेंचि काय हो गातें ३६
श्रीदत्तात्रेयातें नमुनि म्हणे तो अलर्क राजवर
गुरुजी मी उद्धरिलों नरकीं होतों निमग्न आजवर ३७
झाला बरा पराभव कोश-बळांच्या क्षयें परित्रास
आला हा शरण तुज त्रिजगत्-पावन-महा-चरित्रास
उपकारी काशीश्वर अग्रज माझा सुबाहुही मोठा
खोटा गमला जाड्यें त्वत्संगचि लाभ राज्य तो तोटा ३९
व्यसन बहु बरें तें कीं आलों या ज्ञानदा पदापासीं
सांपडतों काळाच्या भोगाया आपदा सदा पाशीं ४०
स्वामी भवत्-प्रसाद- ज्वलनें अज्ञान सर्वही जळलें
कळलें स्वहित तुम्ही जनतें कीं मन बहु विषय-सेवनें मळलें
आतां बा निजराज्य प्राज्य-श्रम-ताप-कारण त्यजिन
अजि न व्यसनभर तें हित सेविन धन्य धरिन मी अजिन
दत्त म्हणे भव्य तुझें नित्य असो योजिलें बरें बा हें
जा राजा हो निर्मम निरहंकार प्रसन्न मी आहें ४३

---

१ सत्संगरूप जो शस्त्रघर्षण पाषाण त्याचेवर घांसलेलें. (विद्याशस्त्राचें विशेषण) २ अमान्य. ३ वल्कलें. ४ विरघळती. ५ मशक-उदुंबर-मशा आणि उंबराचें फळ. ६ वेगळेपणा.

झालें ज्ञान षडूर्मीचें लावुनि चरणांबुजा शिरा ज्याच्या
त्या गुरुसि नमुनि गेला सत्वर शिबिराशि काशिराजाच्या
भेटुनि बंधु समक्षचि काशिपतिस विहित-संग-कुत्स[1] वदे
घे राज्य नृपा हें कीं अर्पुनि मम अग्रजासि उत्सव दे ४५
काशिपति म्हणे सहसा त्वां निजराज्य न उगेंचि सोडावें
मोडावें न क्षत्रिय- वृत्त कुयश रण करूनि जोडावें ४६
स्मित करुनि अलर्क म्हणे पूर्वी माझें असेंचि मन होतें
सांप्रत विरक्त झालें भरलें वें जेविं रिचवलें पोतें[2] ४७
कारण काशिपते मी कथितों तें श्रवण तूं करीं माचें
जो प्राणि ग्राम असे एक गुणत्रयचि मूळ हें याचें ४८
स्वामी मित्र द्वेषी भृत्य असें तेथवां पहायाचें
कारण कांहींच नसे केवळ अज्ञानचि हें राहायाचें ४९
तुजपासुनि मज झालें भय काशीशा महोग्र भेदानें
शरण श्रीदत्तातें गेलों होऊनि विकळ खेदानें ५०
त्याच्या पद-प्रसादें गेलें अज्ञान सकळ विलयातें
आत्मस्वरूप कैसा तो ज्ञानादर्श[3] न फळविल यातें ५१
राजा त्वच्छत्रु न मी मच्छत्रु न तूं भय-भ्रमा झाला
एक व्यापक आत्मा सर्वत्र प्रत्यया असा आला ५२
ऐसें अलर्क वदतां बहुतचि हर्षे सुबाहु तो आर्य
उठुनि म्हणे काशिपते माझें सिद्धीस पावलें कार्य ५३
झालों कृतार्थ आतां जातों हो तूं सदा सुखी राया
जाया आज्ञा दे बहु हर्ष दिला कार्य करुनियां वा या ५४
काशिपति म्हणे बापा मांग मजकडे कशास आलास
निष्पन्न अर्थ कोण स्पष्ट वद कसा कृतार्थ झालास ५५

---

१ शमसंगाची निंदा करणारा · २ रिकामें झालें · ३ ज्ञान-आदर्श – ज्ञानाचा आरसा

वदलासि मला साधुनि देशोगिनसे अलर्क मद्राज्या
तें जिंकुनि दिलें घे वांछित होतासि नित्य भद्राज्या ५६
ब्रम्हज्ञ सुबाहु म्हणे राजा माझा अलर्क हा भ्राता
ख्याता ज्ञान-सुधेची तटिनी देवी मदालसा माता ५७
त्या ग्राम्य-भोग-सक्ता ब्रम्हज्ञानें घडावया मुक्ती
वैराग्यार्थ करविली तुज योजुनि हे पराभवा युक्ती ५८
मातेनें कर्णांत ज्ञान दिलें आननीं जसें *स्तन्य
धन्य तिचे सुत झालों हा अज्ञचि राहिला जसा अन्य ५९
राहुनि मदालसेच्या गर्भी प्राशूनिही तिचें दुग्ध
न राहावा संसारीं साक्षात् भ्राता अलर्क हा मुग्ध ६०
वास्तव उद्योग असा करवुनि हें साधिलें महाकार्य
हें पात्र ज्ञानातें गावूत तुझ्याहि कीर्तिनें आर्य ६१
काशिपति म्हणे घडल्ये ज्या ज्ञानें गति परा सुबाहो तें
सांग मज्जा हे अमृत उदधि सत्वातें जें +परासु वा होतें ६२
तूं साधु मणत-जनीं सर्वांही त्वां दया करावि खगी
तो उगवला अमृतकर सर्वत्राहि तो दयाकरा विखगी ६३
तो ज्ञानी त्यासि म्हणे विश्वासें मम अहं असा राया
त्वां प्रत्यय न करावा यावरि सोडूनि दे असारा या ६४
वृत्तिरहित अभ्यासें हो न स्वामी तुजा न दास मज
आपण एक विशुद्ध ब्रम्ह असें निश्चयें सदा समज ६५
ऐसा उपदेश करुनि हरुनि भव-भ्रम सुबाहु साधु निघे
काशिप अलर्कहि सुता दे राज्य स्वपद भव्य साधुनि घे ६६
तो आपणासि पाहे मानध सर्वा जगा प्रसन्नातें
प्रमुदित अलर्क होय ब्रम्हाऽनुभवें भजोनि दत्तातें ६७

---

*स्तनांतील(दूध). + मृत, गतप्राण.

हाहा केलें राज्य क्लेशद-विषयांत सर्वदा रमलों
भ्रमलों व्यर्थ परम सुख योगचि हें नुमजलों बहु भ्रमलों
करुणा-सुधा-समुद्रा श्रीदत्ता ब्रम्हवित्-सभा-नाथा
माथा पदीं पहातां उद्धरिसि अलर्क गाय हे गाथा ६९
राज्य सुतानें देवुनि गेला ठेला तपोनिधी रानीं
पावे गति ते वरिली जी श्रुतिगीता तपोनिधीरानीं ७०
पावे सुबाहु-बोधित संग त्यागूनि काशिराज गती
ज्यांकी विरक्ति न तसी ज्याच्या बहु भोगदा शिरा जगतीं
श्रीमद्गुरुपुत्राहीं आज्ञा केली निरोप पारखुनी
श्रीराम-सुत-मयूरें लिहिलें श्रीहरि-हरांघ्रि आरखुनी ७२
श्रीहरि-हर-कीर्ति तसी न सुख-मनीं तुनि मदालसा जावी
साधु-सभेंत रसिक हो प्रेमें ऐकुनि वदाल साजावी ७३
मूर्तिमती श्री-शंकर- करुणाचि मदालसा असी अन्या
धन्या कोणाला ही झाली नाहीं महासती कन्या ७४
हें सच्चरित्र भावें गावें निःशेषही अघ सराया
उच्चपदीं वेधाया तेथुनि कल्पक्षयीं न घसराया ७५

समाप्त